श्रद्धा 卐 त्याग

# वीणा-तरंग

कल्चरल एज्युकेशन सोसायटीच्या

## नागपूर संस्कृत कॉलेजचें

### प्रथम प्रकाशन

संपादक

प्रो. दि. वि. वराडपांडे, एम्. ए.

अध्यक्ष, ना. सं. कॉलेज.

गुरुपौर्णिमा, शके १८६१

( १ जुलै १९३९ )

मूल्य ] [ १॥ रु.

श्रद्धा 卐 त्याग

# वीणा-तरंग

कल्चरल एज्युकेशन सोसायटीच्या

## नागपूर संस्कृत कॉलेजचें

प्रथम प्रकाशन

संपादक

प्रो. दि. वि. वराडपांडे, एम्. ए.

अध्यक्ष, ना. सं. कॉलेज.

गुरुपौर्णिमा, शके १८६१

( १ जुलै १९३९ )

मूल्य ] [ १॥ रु.

# अनुक्रमणिका.



## मराठी विभाग.



## English Section.



## संस्कृत-विभागः

# MEANS TO THE END.



" The ancients who wished to illustrate illustrious virtue throughout the Empire, first ordered well their own States. Wishing to order well their own states, they first regulated their families. Wishing to regulate their families they first cultivated their persons. Wishing to cultivate their persons they first rectified their hearts. Wishing to rectify their hearts they first thought to be sincere in their thoughts. Wishing to be sincere in their thoughts, they first extended to the utmost their knowledge. Such extension of knowledge lay in the investigation of things. Things being investigated, knowledge became complete. Their knowledge being complete their thoughts were sincere. Their thoughts being sincere, their hearts were thus rectified, their hearts being rectified, their persons were cultivated. Their persons being cultivated, their families were regulated. Their families being regulated their states were rightly governed. The whole Empire was made tranquil and happy."

——O——

# संपादकीय

प्रकाशनाच्या क्षेत्रांत हें पहिलें पाऊल टाकतांना **नागपूर संस्कृत कॉलेज** सारख्या लहान संस्थेला भीतियुक्त संकोच वाटत असल्यास नवल नाहीं. पण "अभ्यासेंचि प्रगट व्हावें" ह्या समर्थोक्तिवर श्रद्धा असल्यामुळें आत्मविश्वासही वाटतो. तसेंच संकल्पित कार्य हळूं हळूं कां होईना पण निश्चितपणें पार पडत असल्याचा आनन्द व समाधान त्यांत भर घालीत आहे.

"**वीणा-तरंग**" हा लेख-संग्रह ना० सं० कॉलेजच्या कांहीं अभ्यासू शिक्षक व विद्यार्थ्यांचा प्रयत्न आहे. त्याचें रसग्रहण अगर मूल्यमापन रसिक जनांनीच करायचें आहे. आम्हीं आपल्या तर्फे यथाशक्य विविधता, रोचकता, उपयोगिता इत्यादि दृष्टीनें लेखांची निवड केली आहे. पण "आपरितोषाद्विदुषां" आमचें चित्त "आत्मन्यप्रत्ययं" असेंच राहणार. अनुक्रमणिके वर सहज दृष्टिक्षेप केला तरी वरील विधानाची सत्यता पटेल. आंतील पानांचें वाचन तिला दृढ करील अशी आशा आहे. साहित्यिक, समालोचनात्मक, वेदान्त, ज्योतिष, शिल्प इ० शास्त्र विषयक लेख येथें संग्रहित केले आहेत. भाषेच्या बाबतींतही वैविध्य दिसून येईल. मराठी, इंग्रजी व संस्कृत ह्या तीनही भाषांत लेख आहेत. त्यामुळें सर्व प्रकारच्या वाचकांची थोडी तरी सोय होईल असें वाटतें.

विशेषतः, आम्हीं संस्कृत विभागांतील पहिल्या विषयाकडे वाचकांचे लक्ष वेधूं इच्छितों. जुनीं अप्रकाशित हस्तलिखितें संशोधून प्रसिद्ध करणें हेंही एक कार्य आमच्या संस्थेच्या उद्देशांपैकीं असल्यामुळें व अनायासें तसें एक हस्तलिखित उपलब्ध झाल्यामुळें त्याचें प्रकाशन करण्याचें ठरविलें. त्याचाही अन्तर्भाव ह्याच लेखसंग्रहांत केला आहे. प्रस्तुत हस्तलिखित श्री. विनायक माधव संगमकर यांचे कृपेनें आम्हांस मिळालें. तें श्री. गणेश शास्त्री वाठोडकर नामक नागपूरस्थ पंडिताने लिहिलें असून स्वकृत टीकाही त्याला जोडली आहे. तें आज १०५ वर्षांचे जुनें आहे व प्रथमच प्रसिद्ध होत आहे. प्रस्तुत हरिविनोद काव्य जुन्या पीढींतील नागपूरस्थ विद्वानांचे रसिक-ग्रंथकर्तृत्व थोडें तरी दिग्दर्शित करूं शकेल असें वाटतें. हस्तलिखिताबद्दल श्री. संगमकर शास्त्रींचे आम्हीं ऋणी आहोंत.

आमच्या लेखक-मित्रांनींही आम्हांस सक्रिय मदत केली आहे व थोड्या अवकाशांत लेख लिहून दिले. त्याबद्दल त्या सर्वांचे आम्ही आभारी आहोंत. श्री. माधव प्रयाग पांडे यांनीं कुन्दमाला नाटका वरील आपला संशोधनात्मक इंग्रजी लेख विनंती करतांच दिल्याबद्दल त्यांचे उपकार विशेष आहेत.

तसेंच, त्रास होत असतानांही संस्कृत सारखें 'किचकट' छपाईचें काम घाईनें पण सुबक व शुद्धपणें केल्याबद्दल गोपाल प्रिंटींग प्रेसचे व्यवस्थापक श्री. त्र्यं. गो. केळापुरे यांना, मुखपृष्ठावरील चित्र काढून दिल्याबद्दल श्री. त्र्यं. ग. पाठक B. A. यांना, प्रुफें तपासण्यांत साहाय्य केल्याबद्दल श्री. श्रीधर नारायण हुद्दार B. A. (टिळक) यांना, वेळोंवेळीं सल्ला दिल्याबद्दल प्रो. सावळापुरकर व श्री. गं. रा. देव यांना धन्यवाद देणें आमचें परम कर्तव्य होय व तें आम्ही मोठ्या आनंदानें करीत आहोंत.

पुस्तकाला 'Foreword' लिहावयास श्री. ज. मा. कायन्दे B. A., M. R. A. S., कल्चरल एज्युकेशन सोसायटीचे संस्थापक, हल्लीं भोंसला मिलिटरी स्कूल (नाशिक)चे प्रिन्सिपाल, हे जिव्हाळ्याचे संबंधी अनायासेंच लाभले ह्याचे समाधान होत आहे. त्यांच्या इतर अनेक ऋणांप्रमाणेच ह्याही ऋणांत सदैव बद्ध राहण्यांतच आम्हांस संतोष आहे.

आमच्या घाईमुळें ज्या आमच्या विद्यार्थी किंवा शिक्षकांना वेळेवर लेख लिहितां आले नाहींत त्यांची, तसेंच ज्यांचे लेख वेळेवर येऊन ही स्थलाभावास्तव अंतर्भूत करतां आले नाहींत त्यांची मनापासून क्षमा मागतों.

अखेरची विनन्ती संस्कृतप्रेमी उदार जनतेस करायची आहे. **ना. सं. कॉलेज** ही संस्था लोकोपयोगी असल्यामुळें सर्वथा लोकाश्रयावर अवलंबून आहे. प्रस्तुत प्रकाशनास समाजानें आर्थिक मदत केल्यास संस्थेचे कल्याण होणार आहे. निदान स्वतः एक प्रत विकत घेऊन इतरांसही तसें करण्याची शिफारस केल्यास उपकार होतील.

गुरु पौर्णिमा
शके १८६१

**दि. वि. वराडपांडे**
**( अध्यक्ष, ना. सं. कॉलेज )**
संपादक

# FOREWORD.

To write a foreword to the present publication is a privilege and a fortune! Simply because the writer and the publication are bound by the ties different from those of ordinary sympathy and courtesy. They are of flesh and blood. As founder of the Cultural Educational Society, I had laid it down, that publication of good books was one of the means of silently serving the society around. This is an important first publication consonant with the con. templations and conceptions of the Society. Our " Guiding Light " published and distributed up to this time, was a free service without any tax on the public purse. This is going to be a service with a little price; hence, I hope it will be " Valued " both by us and by the public·

To arouse the society from a kind of intellectual and moral stupor may seem to be a big ideal and for " Little Souls " as we few are, some may in their conceit term it " Preposterous " as they actually did, when we started the Nagpur ( now City ) College in 1930. Yet, let it be remembered, it is always the privilege of the few to be silently watching the game of life and offer correct criticism and if need be even " Light ". It is not a matter of " Circumstances " as many think; it is a matter of " Capacity ". To seem unemotional when every one around us is shaking with franzied emotions, to tread Eastward when the crowd is fast pacing Westward, to keep up convictions, when one by one they are being shattered even in the great ones, is a matter of "Character " and not " Policy." The ' Few ' of the Cultural Education Society have a firm faith in silent service and sacrifice as the means to that service. This publication is one of the proofs of the results achieved so far.

Right since the establishment of the Nagpur Sanskrit College in 1930 by Prof. D. V. Varadpande, M. A. he has been, true to his grain, doing a very great silent service in diffusing the essential Sanskrit learning, with the help of the 'few' of his comrades, without fuss or tomtomming, unaided finacially by any charity worth the name.

During these nine years he has striven to inspire and fire some hearts whose writings will be found in the "VEENA-TARANG", and the society is free to judge of its merits and worth.

From our view point, the step that is being put forward is a sure step towards further progress, in the life of the Nagpur Sanskit College. The Scholars who have contributed towards its being published are now the torch bearers of the Oriental wisdom, presenting it free from accidental or occidental enthraldom of any sort. They have of course faith in the meeting of the 'East and West'. They believe in the progress which is the result of thorough assimilation of diverse cultural view points. They believe further that silent thoughts and not noisy propaganda can permeate and change society and make it fit to survive in the struggle for existance. The problems confronting the struggle are important and many. They could be tackled only by silent thinkers. The truthfulness of the thoughts would be justified by the silent revolution that they would bring about in the ways and the life of the people around.

The forces of light and culture take a long time to wield their sway. They are often checked and curbed by the forces of darkness and evil and yet patience is found to be their natural helpmate and they gain ground slowly but surely.

I, therefore, congratulate Prof. Varadpande and "his faithful few" in having placed this necessary and valuable book in the hands of the "Seekers after truth". Let the readers dive through the pages of 'VEENA TARANG" with open mind. If they find something that really touches their finer chord and elements either Poetically, Scientifically or Practically they should graciously commend the same to their enlightened friends. Their criticism, however, should be sent to the publishers for further guidance.

The Nagpur Sanskrit College stands in need of financial reserve for wider activities. Every book sold will add its little mite towards this 'Fund', I ask very little of the readers—only that they should be pleased to purchase a copy and recommend one to their intimate friends.

With sincere and heartfelt prayers to the "Unseen" who has favoured this publication to see the Light of the day, I tender it to the good graces of all friends of "Culture".

Nagpur:
*Dated the 1st July 1939.*

**J. M. Kayande,**
B. A., M. R. A. S.
FOUNDER,
Cultural Education Society.

# वाङ्मयांतला दृष्टिसृष्टिवाद.

लेखकः—**श्री. माधव प्रयाग पांडे**, एम्. ए., वेदांततीर्थ.

[ प्रस्तुत निबंधाचे लेखक **श्री. मा. प्र. पांडे**, M. A., **वेदान्ततीर्थ**, हे हल्ली किंग एडवर्ड मेमोरियल स्कालरशिप मिळवून संशोधन करीत आहेत. काव्यनिर्मितीचें सूक्ष्म स्वरूप दाखवितांना त्यांची दार्शनिक प्रवृत्ति स्पष्ट दिसून येते. वेदान्ततीर्थ परिक्षेचा अभ्यास करीत असतांना त्यांचा भा. सं. कॉलेजशीं सम्बन्ध आला.—**संपादक** ].

सौंदर्य हें वस्तुनिष्ठ की दृष्टिनिष्ठ या प्रश्नाचा प्राचीन संस्कृत ग्रंथकारांनींही चांगला विचार केला होता असें आढळून येतें. दहाव्या शतकांतले नांवाजलेले पण्डित अभिनवगुप्त यांच्या '**ध्वन्यालोकलोचना**'च्या एका मंगल श्लोकांत त्यांची प्रतिभे-संबंधींची कल्पना स्पष्ट दिसून येते.

तो श्लोक असा—

**यदुन्मीलनशक्त्यैव विश्वमुन्मीलति क्षणात्।**
**स्वात्मायतनविश्रान्तां तां वन्दे प्रतिभां शिवाम्॥**[1]

जिच्या उन्मीलनशक्तीमुळे विश्व क्षणांत उमलतें, अशा स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणीं लीन असणाऱ्या शक्तीला मी वन्दन करितों. या श्लोकांत दोन गोष्टी स्पष्ट होतात. प्रतिभा आत्म्याची शक्ति आहे व ती अशी शक्ति आहे की, जिच्या योगाने, जणु वसन्त वायुलहरीच्या स्पर्शाने विश्वाची कळी एकदम उमलते व सुखदुःखांनीं गजबजलेला संसाराचा अवाढव्य पसारा आपल्यापुढे पसरला जातो. परमेश्वराची सृष्टिनिर्मिति अशी विकासमय असते. सृष्टिनिर्मितीच्या अगोदर जगाचें चिरन्तम कारण आपल्याच सुखांत पहुडलें असतें. त्यावेळी माया एखाद्या प्रेयसीसारखी अंगांत अंग मिळवून—एकजीव होऊन परमेश्वराच्या ठायीं लीन झालेली असते. अगदीं प्रशान्त सरोवरांत मन्द वायुलहरीने एकच मृदुल तरंग उठावा त्याप्रमाणे सृष्टिनिर्मितीच्या उषःकालीं एकच स्फूर्तितरंग परमेश्वराच्या ठायीं निर्माण होतो— '**बहु स्यां प्रजायेय स ऐक्षत। बहु स्यां प्रजायेय।**' परमेश्वराच्या या पहिल्या इक्षणांत सृष्टीच्या बीजाला अंकुर फुटतो व त्याचीच झरझर वाढ होऊन 'ऊर्ध्वमूल' आणि 'अवाक्शाख' असा संसाराचा अश्वत्थ वृक्ष निर्माण होतो. परमेश्वराचें हें ईक्षण म्हणजेच माया आणि ही ईक्षणस्वरूपिणी माया सृष्टिनिर्मितीचें कारण होय.

---

१ ध्वन्यालोक, निर्णयसागर एडिशन. पृष्ठ ७२

अभिनवगुप्तांनी परमेश्वराच्या निर्माणशक्तीला प्रतिभा असें संबोधून प्रतिभेचें स्वरूप स्पष्ट केलें आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा की, प्रतिभा ही सुद्धां एक निर्माणशक्तीच आहे. सृष्टिनिर्मितीच्या आणि कलानिर्मितीच्या बुडाशी एकच शक्ति आहे, ती म्हणजे प्रतिभा. या शक्तिलाच ती ईश्वरनिष्ठ असली म्हणजे आपण माया म्हणतो व ती कविनिष्ठ असली म्हणजे आपण प्रतिभा म्हणतो.

वरील श्लोकांत प्रतिभेचें वर्णन सहजगत्या आलेलें आहे. तिची व्याख्या करावयाची म्हणून नव्हे. त्या वर्णनांत महत्वाची गोष्ट हीच की, प्रतिभेचें दैवी स्वरूप त्यांत स्पष्टपणें मांडलेलें आहे. प्रतिभेची शास्त्रशुद्ध व्याख्याही अभिनवगुप्तांनी पुढें केलेली आहे ती अशी—**'प्रतिभा अपूर्व वस्तुनिर्माणक्षमा प्रज्ञा'**[1]—म्हणजे नवीन वस्तु निर्माण करण्यास समर्थ असलेली प्रज्ञा तिला प्रतिभा असें म्हणतात. पण या नवीन वस्तु निर्माण करण्याकरितां प्रतिभेला स्वतःचे पलीकडे मुळींच जावें लागत नाहीं. कारण ती निर्मिति परमेश्वराचे सृष्टिनिर्मितीप्रमाणे केवळ ईक्षणस्वरूप असते—कल्पनामय असते—ideal असते. पण या काल्पनिकतेमुळे तिच्या वास्तवतेला बाधा येत नाहीं. कारण निर्मिति ही ईक्षणस्वरूप असते असें मान्य केल्यानंतर वास्तव आणि काल्पनिक यांत फारच थोडा फरक उरतो. ज्या गोष्टी सर्वांच्या अनुभवाला येतात त्यांना आपण वास्तविक म्हणतो व ज्या गोष्टी एखाद्या व्यक्तीच्याच अनुभवाला येतात त्यांना आपण काल्पनिक म्हणतो. कोणाही अनुभवाचें क्षेत्र जसजसें जास्त विस्तृत होत जातें तसतशी त्याला जास्त जास्त वास्तविकता प्राप्त होऊं लागते व तें क्षेत्र जसजसें संकुचित होतें तसतसा तो अनुभव जास्त जास्त काल्पनिक होऊं लागतो. थोड्या निराळ्या शब्दांत सांगावयाचें झालें तर असें म्हणतां येईल की, ईश्वरसृष्टि ही वास्तविक असते आणि जीवसृष्टि ही काल्पनिक असते.

या निर्माणशक्तीचा विशेष काय असें विचारलें असतां अभिनवगुप्त उत्तर देतात—**' तस्याश्च विशेषो रसावेश वैशद्य-काव्य-निर्माणक्षमत्वम् '**—म्हणजे रसांनी ओथंबलेलें काव्य निर्मितां येणें. अभिनवगुप्तांचा अवतार काव्याच्या प्रांतांत रसाचें एकाधिराज्य स्थापन करण्याकरिता झाला होता हें ध्यानांत आणलें तर या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं. असें जरी असलें तरी या व्याख्येंत काव्याच्या क्षेत्राचा विनाकारण संकोच करण्यांत आलेला आहे, असें वाटणें साहजिक आहे. कारण पुष्कळदां असें घडतें की काव्यांत सौंदर्य असतें, आनंद असतो, पण त्याच्या वाचनाने उत्पन्न केलेली मानसिक अवस्था ही त्या ठराविक आठ दहा रसांच्या चौकटींत बसविण्यासारखी नसते. असल्या काव्यांना अभिनवगुप्तांच्या व्याख्येमुळे सरस्वतीच्या मंदिरांत प्रवेश मिळणार नाहीं. नुकतेंच उमललेलें सुंदर फूल पाहिलें असतां आपल्याला जो आनंदाचा

---

१ ध्वन्यालोक, निर्णयसागर एडिशन. पृष्ठ ३४

उमाळा येतो त्याला कोणत्या रसाच्या चौकटींत बसवितां येईल ? संध्याकाळ आणि उष:काल, वनश्री आणि जलाशय यांच्या वर्णनांतलें सौंदर्य हें रस नसूनही सुंदर असूं शकतें हें विसरून चालावयाचें नाहीं. रसध्वनीलाच सर्वस्व मानल्यामुळें काव्याच्या व्याख्येंत उत्पन्न होणारी ही उणीव ध्वनिकार आणि आनंदवर्धन यांनीं अगोदरच ओळखली होती, म्हणूनच त्यांनी ध्वनिकाव्यांत वस्तुध्वनि आणि अलंकारध्वनि यांनाही रसध्वनीच्या बरोबर स्थान दिलें.

पण अभिनवगुप्त जसे रसाच्या पायीं वेडे झाले होते तशीच गत ध्वनिकारांची ध्वनीच्या बाबतींत झाली. अलंकार व वस्तु ही ध्वनित असतांनाच सुंदर असतात. तीं जेव्हां वाच्य असतात व त्यांना खुलविणारें रसतत्त्व त्यांच्या मागें नसतें तेव्हां त्या काव्याला चित्र-काव्य—म्हणजे जिवंत काव्याचें निर्जीव चित्र—म्हणावयाचें असें त्यांनी ठाम ठरवून टाकलें. वाच्य अलंकारांना अगदींच गौण स्थान दिल्यामुळें ध्वनिकारांच्या काव्याबद्दलच्या कल्पनेंत भासणारी ही उणीव कुन्तल आणि त्यांच्या नंतर जगन्नाथ पंडित यांनी भरून काढली. त्यांनी असें दाखवून दिलें कीं, निर्ध्वनि-नीरस अशीं काव्येंही सुंदर असूं शकतात. नंतरच्या अलंकारिकांत कुन्तलानें या गोष्टीवर विशेष भर दिला आणि रस अगर ध्वनि असो वा नसो कवीची प्रतिभा हीच अलंकाराच्या सौंदर्याचें निधान होय असें ठरवून टाकलें. पण तो तो अलंकार, त्याचा सौंदर्यविशेष ( शास्त्रीय परिभाषेंत त्या अलंकाराचा विच्छित्तिविशेष ) आणि कवीची प्रतिभा यांचा संबंध स्पष्टपणें मांडण्याचें काम अजून राहिलें होतें, तें काम जगन्नाथ पण्डितांनी केलें. त्यांनीं सांगितलें की, अलंकाराचें सौंदर्य म्हणजे त्याच्या मुळाशीं असलेल्या प्रतिभेचें एक विशिष्ट परिणत-स्वरूप-कारण-स्वरूपिणी प्रतिभा कार्यरूपांत परिणत झाली म्हणजे सुंदर अलंकार निर्माण होतात. त्यांनी विच्छित्तीची व्याख्या अशी केलेली आहे—
'**अलंकाराणां परस्परविच्छेदस्य वैलक्षण्यस्य हेतुभूतां जन्यतासंसर्गेण काव्यनिष्ठा कविप्रतिभा विछित्ति ।**' प्रत्येक अलंकाराचें स्वत: दुसऱ्यापासून भिन्न असें सौंदर्य असतें. एक अलंकार आपणाला दुसऱ्यापासून वेगळा वाटतो व त्या दोन अलंकारांत परस्पर वैलक्षण्याची आपणाला प्रतीति होते याचें कारण त्या अलंकाराचें ठिकाणी असलेली विच्छित्ति होय. ही विच्छित्ति म्हणजे कार्यरूपाने काव्याच्या ठिकाणी असणारी कवीची प्रतिभाच होय. प्रतिभेचें स्वरूप आपणाला अभिनवगुप्तांनी स्पष्ट करून सांगितलेंच आहे. प्रतिभा म्हणजे ईक्षण आणि ईक्षण म्हणजे दृष्टि—कल्पनामय निर्मिति.

येथें एक लहानसा प्रश्न उपस्थित होतो तो म्हणजे कुन्तल आणि जगन्नाथ पण्डितांनी वाच्य अलंकारांचें स्वयंभू सौंदर्य रसध्वनिनिरपेक्ष काव्यांत जसें पटवून

दिलें तसें त्यांनीं 'वस्तू'च्या बाबतींत केलें नाहीं; म्हणजे त्यांच्याही दृष्टीनें वस्तु ही ध्वनित असतांनाच सुंदर असूं शकते, वाच्य असतांना नव्हे—आणि हीं एक त्यांच्या काव्याच्या कल्पनेंतली उणीवच नव्हे का ! या प्रश्नाला असें नवीन ( कारण जुन्या लोकांनी हा प्रश्न सोडविला नाहीं ही गोष्ट खरी आहे ) उत्तर देतां येईल की, वाच्य वस्तु म्हणजे स्वभावोक्ति अलंकार होय. स्वभावोक्ति हा सुंदर अलंकार असूं शकतो असें आलंकारिकांनी मान्य केलें असल्यामुळें त्यांना दोष देण्याचें कांहीच कारण उरत नाहीं आणि स्वभावोक्तीची आलंकारिकांनीं अलंकारांतच गणना केली असल्यामुळें निराळ्या वाच्य वस्तूचा विचार करण्याचें त्यांना काम पडलें नाही. असें जरी असलें तरी कुन्तलाला स्वभावोक्ति हा अलंकारच मान्य नव्हता हें ध्यानांत आणलें तर त्याच्या व्याख्येंत थोडा तरी दोष आहे हें कबूल करावें लागेल.

अभिनवगुप्तांनी रसमय काव्य म्हणजे प्रतिभेची निर्मिति आणि निर्मिति म्हणजे ईक्षण असा सिद्धांत पुढें मांडला. ही कल्पना वस्तु आणि अलंकार यांच्या बाबतींत पुढच्या आलंकारिकांनी उपयोगांत आणली आणि सुंदर अलंकार म्हणजे प्रतिभेची धारण केलेली गोजिरवाणी दृष्टिगोचर अशीं व्यक्त रूपें ही गोष्ट पुढे मांडली. या दोनही मतांत आपणाला दोन गोष्टी आढळून येतात—काव्य ही निर्मिति होय (ही निर्मिति अर्थात ईक्षणस्वरूप ) आणि काव्यांतलें सौंदर्य हें दृष्टिनिष्ठ असतें. काव्य ही प्रतिभेची निर्मिति आहे असें ठरलें कीं, सौंदर्य हें दृष्टिनिष्ठ आहे असें आलेंच.

येथें एक घोटाळ्यांत पाडणारा नवीन प्रश्न उपस्थित होतो. कवीच्या बाबतींत काव्य ही निर्मिति आणि सौंदर्य दृष्टिनिष्ठ ही गोष्ट कबूल करता येईल. पण ही गोष्ट वाचकांच्या बाबतींत खरी नाहीं. कारण काव्य हें कवीला आन्तर असतें पण वाचकाला तें बाह्य असतें. काव्य वाचतांना मनुष्य एक विशिष्ट बाह्य वस्तु अनुभवगोचर करीत असतो आणि तिच्या ठिकाणच्या सौंदर्याचा आस्वाद घेत असतो. आणि खरें म्हटलें तर सौंदर्य वस्तुनिष्ठ कीं दृष्टिनिष्ठ हा विचार वाचकाच्या दृष्टीनेंच करावयास हवा. कारण काव्यांत लिहिणें हा गौण प्रश्न असतो. वाचलें जाणें हीच गोष्ट त्याला काव्यत्व प्राप्त करून देण्यास आवश्यक असतें. हा प्रश्न जुन्या लोकांना अशा स्वरूपांत पडला नव्हता, अर्थात् त्या काळीं सौंदर्य दृष्टिनिष्ठ की वस्तुनिष्ठ हाही वाद नव्हता आणि कला ही ध्येयवादी असावी की वास्तववादी असावी यावर रणेंही माजत नव्हती. पण या प्रश्नाचें बिनचूक उत्तर त्यांनी अगोदरच देऊन ठेविलें आहे. हें पाहिलें म्हणजे त्यांच्या सूक्ष्म विचाराचें कौतुक करावेसें वाटतें. तें उत्तर म्हणजे अभिनवगुप्तांची हृदयसंवादाची प्रभावी कल्पना. या कल्पनेप्रमाणें वाचक

द्वाही निर्माताच असतो आणि त्याला भासणारें सौंदर्य हेंही दृष्टिनिष्ठच असतें. काव्यांतल्या शब्दांच्या जादुमुळें वाचक हा आपलें देहभान विसरतो व कवीशी तन्मयता पावतो व त्यामुळें कवीला जें दिसलें तेंच याला दिसूं लागते व कवीप्रमाणेंच हा आनंदाच्या समाधींत मग्न होतो. या तन्मयतेचें कारण हृदयसंवाद. या हृदयसंवादाला अनुकूल परिस्थिति म्हणजे शब्दांची प्रामुख्ये-करून व्यंजकता. हृदयसंवाद म्हणजे दोन हृदयाची समानसंवेदनक्षमता. दोन अगदीं सारख्या वीणा असल्या आणि त्या दोन निरनिराळया खोल्यांत ठेवल्या, आणि त्यांतली एकीची तार छेडली की दुसरींतूनही मधुर आलाप निघूं लागतात. तेव्हां या दोन वीणांत संवाद आहे असें म्हणतां येईल. त्याचप्रमाणें जेव्हां सहृदय वाचक काव्य वाचूं लागतो तेव्हां कवीच्या हृदयवीणेंत ज्या भावनांचे आलाप निघत होते त्याच भावनांनी त्याची ही हृदयवीणा छेडल्या जाते. शद्बांच्या प्रभावामुळे वाचक एकदम कवीच्या मनःस्थितींत खेंचल्या जातो आणि कवीबरोबरच सौंदर्यसृष्टीची निर्मिति करून तिचा अस्वाद घेऊं लागतो. त्याची रीत मात्र कवीच्या अगदीं उलट असते. कवि काल्पनिक काव्यसृष्टीपासून सुरुवात करून शेवटी शद्बांपाशी येऊन पोंचतो, वाचक शद्बांपासून सुरवात करतो आणि शेवटीं काव्यसृष्टींत प्रवेश करतो. मात्र दोन्ही ठिकाणीं काव्यसृष्टि ही निर्मिति आणि सौंदर्य हें दृष्टिनिष्ठ ही गोष्ट खरी असते. वाचकाच्या या काव्यास्वादांत काव्यसृष्टि ही वाच्य नसून संक्रम्य ( to be trasmitted ) असतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हें संक्र-मणस्वरूप वगळलें तर हृदयसंवादाच्या तत्त्वाला अर्थच उरत नाहीं. काव्यसृष्टीच्या या संक्रम्यतेचें खरें स्वरूप अभिनवगुप्तांना चांगलें समजलें होतें. म्हणूनच रसध्वनि हा कधीही वाच्य नसतो असा त्यांचा आग्रह आहे. त्या काळच्या कल्पनांना अनुसरून त्यांनी या संक्रमणशक्तीला व्यंजना असें नांव दिलें आणि शद्बांना व्यंजक म्हणून संबोधिलें. पण सध्याच्या परिभाषेंत त्यांच्या मताला symbolism असेंच नांव देणें योग्य आहे. ही संक्रमणशक्तिरूपी व्यंजना आणि आलंकारिकांची सर्वसाधारण व्यंजना यांचें स्वरूप एक नाही ही गोष्ट आपण ओळखली पाहिजे. आणि हा फरक नंतरच्या आलंकारिकांच्या ध्यानांत न आल्यामुळे जे घोटाळे माजले त्यांचा विचार करतो म्हटलें तर निराळाच लेख लिहावा लागेल.

---

# आजचा ब्राम्हण !

लेखकः— **श्री. रा. ब. बक्षी,** बी. ए. एल्एल्. बी., काव्यतीर्थ.

[ ब्राम्हणांच्या सद्यःस्थितीचें चित्र रेखाटून त्यांच्या भवितव्याचें दिग्दर्शन करणाऱ्या ह्या लेखाचें लेखक **श्री. रा. श्री. बक्षी, बी. ए., एल्एल्. बी., काव्यतीर्थ** हे असून त्यांचा व्यासंग दांडगा आहे. ते नागपूर संस्कृत कॉलेजचे भूतपूर्व विद्यार्थी तसेच संस्थेचे चहाते आहेत.—**संपादक** ]

'आजचा ब्राम्हण' हा मथळा दृष्टिपथांत उतरतांच सर्व सामान्यवाचक त्यावर नाक मुरडतील, नव्हे कित्येकांच्या पायाची आग मस्तकास झोंबेल. ब्राम्हण हा शब्द बहुजन समाजास इतका वावडा झाला आहे कीं, सामाजिक प्रगतीस खुंटविणारा हा जातीयवाद आहे, इतकेंच नाहीं तर राष्ट्राच्या अभ्युदयाची यत्किंचित् तमा न बाळगणाऱ्या बावळ्या भटुरक्यांची ही विघातक विचारसरणी आहे असा दुर्ग्रह करून कित्येक संतप्त होतील, तर कित्येकांचीं मनें विषण्ण होतील. परंतु वाचकगणास मी असे आश्वासन देऊं इच्छितो कीं, सांप्रत कांग्रेसच्या स्वार्थसाधु राजकारणांतून उत्पन्न झालेल्या दूषित वातावरणांत विषारी द्रव्य संमिश्रित करण्याचें कृष्णकृत्य प्रतिपाद्य विषयांतून होणार नाहीं.

आजच्या ब्राम्हणाचें शब्दचित्र रेखाटण्यापूर्वी कालाच्या ओघांत आणि परिस्थितीच्या रगड्यांत बदलत आलेलें त्याचें स्वरूप पाहूं या. कारण भूत आणि वर्तमान ह्या दोन्हीं कालाच्या चित्रपटाचें दिग्दर्शन समोरासमोर झाल्यानें अंतःकरणाच्या सुप्त वृत्ति जागृत होतात व मनुष्याचा ध्येयप्रेरक स्वाभिमान उचंबळून उठतो, असा सिद्धांत आहे.

ज्या ब्राम्हणानें वेदकालांत आपल्या अचाट बुद्धिसामर्थ्यावर चतुर्मुखी ब्रम्हदेवाचें मुख मण्डित करून 'ब्राम्हणोऽस्य मुखमासीत्' हा अतुल मान मिळविला, जो उपनिषद्कालांत प्रगाढ वेदान्ती व खंदा ब्रम्हनिष्ठ म्हणून नांवाजला गेला, ज्यानें 'इदं ब्राम्हं इदं क्षात्रं' अशा शापादपि शरादपि तेजानें पौराणिक कालांत अलम् दुनियेस हादरून सोडलें आणि ज्यानें आपलें चौफेर ज्ञान, तपोबल व निःस्पृह वृत्ति यांच्या अधिष्ठानावर भारत वर्षाचा इतिहास उज्वल केला; इतकेंच नव्हे तर गोब्राम्हणप्रतिपालक छत्रपति श्री. शिवरायांच्या कालापर्यंत 'वर्णानां ब्राम्हणो गुरुः' म्हणवून ज्यानें आपल्या थोरवीस यत्किंचित् धक्का लागूं दिला नाहीं आणि ऋषिमुनींच्या पूर्व पुण्याईवर ज्यानें आपलें आसन नाममात्र कां होईना आज मितीसहि कायम ठेविलें त्या तेजस्वी ब्राम्हणाचें दिव्य स्वरूप आज कुठें तरी पहावयास सांपडेल कां? ज्या ब्राम्हण वर्णांत आखें विश्व व्यापणाऱ्या अज्ञान तिमिराचा निरास

करणारा ज्ञानमार्तण्ड श्रीमान् व्यासमुनि उदयास आला, ज्यांत परधर्माचें वादळी हल्ल्यांतून सनातन वैदिक-धर्माचा ध्वज उच्चस्थानीं फडकत ठेवणाऱ्या धर्म प्रस्थापक श्री शंकराचार्यांचा अवतार झाला, ज्यांत म्लेंच्छसत्तेपासून आर्यधर्माचें पावित्र्य रक्षिण्याचें हेतूनें राजनीतीचे यशस्वी डाव खेळणाऱ्या राजकारणपटु आर्य चाणक्याचा जन्म झाला, ज्यांत भक्तशिरोमणि ज्ञानदेव एकनाथ झाले, ज्यांत धर्म आणि राजकारण यांची उत्तम सांगड घालून महाराष्ट्रीय स्वातंत्र्याचा अपूर्व धडा शिकविणारे राजगुरु समर्थ रामदास निपजले, ज्यांत महाराष्ट्राच्या बुडत्या स्वातंत्र्यसूर्यास अडविणारे समशेर बहाद्दर बाळाजी विश्वनाथ पेशवे झाले, ज्यांत गुलाम हिंदराष्ट्रांत स्वराज्याचा डंका झडविणारे लोकमान्य टिळक झाले, ज्यांत हिंदुत्व हेंच राष्ट्रीयत्व ही अकल्पित भावना उध्दृत करून तरुण भारतांत नवचैतन्य खेळविणारे स्वातंत्र्यवीर बॅ. सावरकर उत्पन्न झाले, ज्या वर्णांत नाहीं नाहीं त्या क्षेत्रांत आघाडी मारणारे धाडसी पुरुष निर्माण झाले, ती तेजस्वी परंपरा आजच्या ब्राह्मणवर्गांत आढळते का ? ज्या जमातीनें धर्म प्रस्थापिला, समाज बनविला आणि अधिराज्यें चालविलीं त्या जमातीस कोणच्या भूकंपानें पृथ्वीच्या गर्भात लोटलें ? ती खदान व ते लखलखणारे हिरे कोणच्या ज्वालामुखीनें उडवून दिले ? अशीं तीं कोणतीं उपकरणें होतीं कीं, ज्यांच्या बळावर ह्या जातीनें रोमहर्षण इतिहास निर्माण केला आणि भूदेव म्हणून भूतकालाकडून पाठ थोपटून घेतली ? जगाला खरें वाटूं नये इतक्या तुटपुंज्या साधनसामुग्रीचें बळ होतें तें—ती ह्यांची गाईच्या खुराएवढी शिखा, तीन पदरीं यज्ञोपवीत, चार हाताची लंगोटी, पायांत खडावा, मुखांत वेद आणि हातांत पलशदण्ड ! पण हें सर्व काय होतें ? ती शिखा त्यांच्या शीर्षकमध्यांतील वेदीवर फडफडणारा धर्मध्वज होता, तें यज्ञोपवीत त्यांचें पवित्र ज्ञानसूत्र होतें, ती लंगोटी त्यांच्या वैराग्यशीलतेची प्रतीक होती, त्यांच्या खडावाच्या खडखडाटानें पापवृत्तीला दुरून भिरकाविलें होतें व त्यांच्या दण्डाच्या आध्यात्मिक फटकाऱ्यानें आधिभौतिक कामुकता बाजूला दडून गेली होती. ही कविकल्पना बाजूला ठेवून पाहिल्यास ह्या जमातीनें जगाच्या इतिहासांत ह्या क्षुद्र उपकरणांच्या सहाय्यानें अद्‌भूत आणि अपूर्व असा पराक्रम करून दाखविला आहे. ‘ क्रियासिद्धिः सत्वे भवति महतां नोपकरणे ’ ह्या सिद्धान्ताचें हें एक अद्वितीय उदाहरण आहे. परंतु आज— ?

ज्या वर्णाचें जन्मकालीं स्वर्गांत नौबती झडल्या आणि देवांनीं पुष्पवृष्टि केली, ज्यानें आपल्या मोहक बालपणानें जगास हंसविलें, ज्यानें प्रौढावस्थेंत आपल्या मुरब्बी अनुभवानें विश्वास मान डोलावयास लाविली, त्या आमच्या ब्राह्मणसमाजानें आम्हांस प्रांजलपणें कबूली दिली पाहिजे कीं, आज आपल्या

मृत्युलेखाची जय्यत तयारी चालविली आहे, गरुड पुराण अर्धे अधिक लिहून संपविलें आहे. ज्या वर्णाकडे इतरांची डोळे उजलून बघण्याची ताकत नव्हती, ज्याच्याबद्दल तोंडातून ब्र काढण्याकरतां जीभ अडखळत असे, ज्याच्याविरुद्ध चालून जाण्याचा नुसता विचार येतांच पाय लटपटत असत, त्याचीच दुरवस्था पाहिली ह्मणजे सहृदय माणसाच्या अंतःकरणाचें पाणी झाल्याशिवाय रहात नाहीं. जो ब्राम्हण त्रैवर्णिकांचा आधारस्तंभ, राष्ट्राची इभ्रत व दुनियेची शोभा ह्मणून नांदला त्या ब्राम्हणाला ' ब्राह्मण ' ह्मणून राष्ट्र आज उजळ माथ्यानें जगूं देते कां? दुनियेच्या बाजारांत ब्राह्मण ह्मणून कोणी चीज आहे याची कोणास जाणीव आहे का? दुनियेला त्याचा विसर पडला, राष्ट्र त्याची मढी तयार करीत आहे आणि समाज त्याच्या मृत्युशय्येभोंवतीं रामनामाचा जप करीत बसला आहे. तें ह्मातान्र्याचें प्रेतकळा आलेलें जीर्ण शरीर आहे. समाजाला त्याचें दुःख नाहीं, राष्ट्राला त्याचें रडूं येत नाहीं, जग त्याचें गोडवेंहि पण गाणार नाहीं. ही त्याच्या जीवनाची शोककथा ( Tragedy ) आहे.

'Tragedy' आहे गोष्ट खरी, तारुं डुबतें आहे हें स्पष्ट आहे म्हणून दैववादी बनून कपाळावर हात ठेवून बसणें धर्म्य आहे कां? निराशावादानें कुणाचा उद्धार झाला आहे? ' कुणाचाच नाहीं ' असा प्रत्येकाचा आंतला आवाज रोखठोक जबाब देईल. मग उरतें काय, तर ह्या जमातीवर आलेली प्रेतकळा, नैराश्यांतून वाढलेले तिच्या हृदयाचे ठोके आणि वर्धमान रक्ताचा दाब ही सर्व शोकप्रवण परिस्थिति घालविण्याकरतां एखादी अचुक गुणकारी वल्ली शोधली पाहिजे. आत्मपरीक्षण ही ती वल्ली आहे, त्याची मात्रा चढविणें हाच एकमेव मार्ग आहे. आत्मपरीक्षणांत गुणदोषाचे पाढे वाचले जातात, चढत्या उतरत्या भाजणीचे अंक मोजतां येतात आणि पडताळा पाहून चुकीची दुरुस्ती पण करतां येते.

आत्मपरीक्षण करतांना आपणास निरनिराळ्या काळांतील आपल्या स्वरूपाचें विवेचन केलें पाहिजे, त्या बऱ्या-वाईट स्वरूपाचीं कारणें शोधलीं पाहिजेत आणि शेवटीं सद्यःस्थितींतून मार्ग काढण्याकरतां काय करावयास हवें ह्याचा तारतम्य दृष्टीनें विचार केला पाहिजे. वर सुरुवातीलाच ब्राह्मणज्ञातीचें पूर्वस्वरूप ठोकळमानानें चित्रित केलें आहे. त्यांत एक गोष्ट प्रामुख्यानें दिसून येतें कीं ब्राह्मणांनीं आपल्या बुद्धिप्रभावानें प्राप्त केलेलें भूदेवत्व आतां आतांपर्यंत टिकविण्याचा प्रयत्न केला व त्यांत ते यशस्वीही झाले. त्यांना तेव्हां काळांची अनुकूलता एखाद्या सतीप्रमाणें साथ देत होतीच पण त्यांची सत्वशीलता इतकी दांडगी होती कीं, सर्व जगानें त्यांच्यापुढें नमतें घ्यावें. त्यांच्या यशाची गुरुकिल्ली बुद्धिवैभवाचा अंगिकार करून भौतिक ऐश्वर्यास लाथाडण्यांत होती. त्यांनीं कधीं

राज्याची अभिलाषा धरली नाहीं किंवा द्रव्यार्जनाचे उपाय शोधले नाहींत. गुरु किंवा मंत्री ह्यापेक्षां दुसरें स्थान भूषविण्याची महत्वाकांक्षा त्यांनीं बाळगली नाहीं. दरिद्री व निरिच्छ रहाण्यांतच त्यांना आनंद होता. बौद्धिक लक्ष्मी पायावर लोळण घेऊं लागल्यानंतर दुनियेचें सारें दृश्य वैभव त्यांना पैमाल वाटावें, ह्यांत काय आश्चर्य ! त्यांची आध्यात्मिक व पारमार्थिक खूणगांठ जबरदस्त होती, त्यामुळें ऐहिकसुख आपोआप त्यांचें मागें धावूं लागलें. राजे-महाराजे यांचा आश्रय मिळत गेल्यामुळें त्यांना खाण्यापिण्याची कधींच वाण भासली नव्हती. पुढें काळ बदलला, परिस्थिति फिरली आणि ब्रम्हनिष्ठा व ब्रम्हभय यांस जोराची ओहोटी लागली. ब्राम्हणांचे ब्राम्हण्य हळूं हळूं कमी होऊं लागलें, त्यांच्या सत्वानें पाठ फिरविली, त्यांचा दण्ड निष्फल झाला, तरीहि ब्राम्हण आपलें वर्णगुरुत्व स्वाभिमानपूर्वक मिरवीत राहिला. तेव्हां इतर जातींना त्यांची पोकळ आढ्यता जाणवूं लागली.

ह्याच सुमारास पुरातन चातुर्वर्ण्यपद्धतीचेंहि बारा वाजत आले. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या चाराच्या क्रमाक्रमानें घटतां घटतां आज दोनच जाती शिल्लक राहिल्या—एक ब्राम्हण व दुसरी शूद्र जात. अखेर ‘ कलावाद्यन्तयोः स्थितिः ’ हें वचन खरें ठरलें. देशाची राजकीय परिस्थिति बदलल्यामुळें क्षत्रिय वर्गाची गरज नाहींशी झाली व तो वर्ग सहजगत्या नष्ट झाला. परकीय राज्यकर्त्यांच्या फायद्याचें असलें तरी देशाच्या भरभराटीकरतां व्यापार वाढला व त्या वाढत्या वाणिज्य वृत्तीचा शूद्रांनीं अंगीकार केला. अशा रीतीनें वैश्यवर्ण शूद्राशीं एकजीव झाला. कृषिकर्म, गोरक्षण वगैरे कामें शूद्रांकडे होतीं व तीं यथोचित ते करीत राहिले. ह्या तऱ्हेनें ब्राम्हण सोडून इतर वर्ण यांचा सरसकट एकच शूद्र वर्ग बनला व तो वर्ग आज मितीस ब्राम्हणेतर म्हणून नांवाजला आहे. ब्राम्हण मात्र पूर्वसंस्कार, कुलपरंपरा व रुढी ह्यांच्या चक्रांत कसा-बसा तग धरून आहे. बुद्धि वैभवाची मालकी व धर्मकार्यावरील पकड न सोडल्यामुळें त्या वर्णाचें अस्तित्व राहिलें आहे. नाहीं तर त्यास इतर वर्णाप्रमाणें नामशेष व्हावयास कितीसा काळ लागला असता ?

अशा ह्या जिवंत असलेल्या व ब्राम्हण्याला चिकटून बसलेल्या ब्राम्हणाचें स्थान आज समाजांत कुठें आहे हें पाहूं या. सामान्यतः तीन पदरी यज्ञोपवीत एवढेंच स्मृतिचिन्ह धारण करणारा वर्ग म्हणून आज ब्राम्हण जगत आहेत. वास्तविक त्यांचा अस्सलपणा ज्यांत आहे व ज्यामुळें इतरांना त्यांची ओळख पटावी तें त्यांचें प्रभावी अंग पूर्ण नाहींसें झालें. ‘ ब्रम्हं जानातीति ब्राम्हणः । ’ म्हणजे विश्वाचें आदि तत्व जें ब्रम्ह तें जाणणारा तो ब्राम्हण, हा पूर्वकालचा अभिप्रेत अर्थ आजच्या ब्राह्मणाच्या कल्पनाशक्तीच्या बाहेर गेला

आहे. ब्राह्मण ह्या शब्दाचा वेद असाहि दुसरा अर्थ आहे. त्या अर्थास धरून वेद पठण करणारा तो ब्राह्मण ह्या व्याख्येप्रमाणें पाहिलें तरी ब्राह्मण जवळजवळ लुप्त झाला आहे असें ह्मणावें लागेल. कारण देशांत फार थोड्या ठिकाणीं वेदशाळा आहेत, त्यांतून शिकणारा विद्यार्थीवर्ग केवळ भिक्षुकवृत्तीचें ज्ञान संपादनार्थ वेदघोष करीत आहे व असे विद्यार्थी बोटावर मोजण्याइतके आहेत. शिवाय ब्राह्मणानें धर्मोपदेशाचें पवित्र कार्य सोडलें व धर्माधिकारित्वाकडे दुर्लक्ष्य केलें. मग ब्राह्मणाचें ब्राह्मण्य आहे तें कशांत आहे? कुलपरंपरा व रुढीचें रक्षण करण्यांत तें राहिलें आहे. परंतु खरोखर त्यांची धर्मावरील श्रद्धा पार उडत चालली आहे. धर्म ह्मणजे थोतांड आहे ही विचारसरणी त्यांच्यांत फैलावत आहे, राष्ट्राच्या प्रगतीस अडविणारा तो अजस्त्र धोंडा आहे ही समज त्यांच्यांत दृढावत आहे व प्राचीनकालीं रानटी अवस्थेंत उत्पन्न झालेला हा ऐतखाऊंचा वाद आहे असें ते मानूं लागले आहेत. पण हा सर्व परिणाम कशाचा? परकीय राज्यतंत्र हिंदुस्थानांत सुरूं झाल्यापासून व विशेषत: इंग्रजी अंमलापासून हिंदू लोकांची धार्मिक वृत्ति ठेंचण्याचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रयत्न झाले. ब्राह्मण हा राष्ट्रांतला बुद्धिमान वर्ग असतांना तो ह्या प्रयत्नास कसा बळी पडला, हा प्रश्न एकदम उभा रहातो. परंतु त्याचें उत्तर सरळ आहे. एकछत्री इंग्रजी सत्ता प्रस्थापित झाल्या दिवसापासून सरकारचे छत्राखालीं येणाऱ्या यच्चयावत् प्रजेस सारख्या दृष्टीनें वागविण्याचें सरकारचें धोरण ठरलें. हिंदूराज्यांत वर्णगुरु ह्मणून नांवारूपास आलेल्या ब्राह्मणास-ब्राह्मण ह्मणून सरकारने उचलून धरलें नाहीं किंवा शूद्र ह्मणून इतरांना लाथाडलें नाहीं. सरकारचें कारकीर्दींत गुण हें योग्यतेचें मापन ठरलें. त्यामुळें राजाश्रयावर वाढणाऱ्या ब्राह्मणाला आपली पूर्वीची वृत्ति टाकून राजसम्मानित गुण वाढविण्याकडे लक्ष देणें प्राप्त झालें. एकूण ब्राह्मण उघडा पडला व त्याची ब्रह्मविद्या नष्ट झाली. सरकारनें शाळा कॉलेजें काढून त्यांतून इंग्रजी पद्धतीचें शिक्षण सुरूं केलें व त्यांतून बाहेर पडणाऱ्या यशस्वी विद्यार्थ्यांकरतां निरनिराळया हुद्याच्या लठ्ठपगारी नोकऱ्यांचें आमिष समोर केल्यामुळें सर्वांकडून नागावलेला ब्राह्मण एकदम मिंध्यावृत्तीनें समोर झाला. सेवाधर्म न जाणणारा ब्राम्हण आतां सेवक बनला, त्याची धर्मप्रचारक वृत्ति जाऊन आतां पोटभरू वृत्ति बनली व निरिच्छत्वांत आनंद मानणाऱ्या ब्राह्मणाला आतां ऐश्वर्याची गोडी लागली. इंग्रजी शिक्षणांतून झळकणाऱ्या पाश्चात्य संस्कृतीनें बहुतेकांची मनें मोहून टाकली व शिक्षितांना वाटावयास लागलें कीं, आपलं कुठं तरी चुकतं आहे. आपला धर्म सनातन आहे, चातुर्वर्ण्य पद्धति पुरातन आहे, संस्कृति जुनी आहे परंतु सर्व दोषमय आहे. त्यांची अंतर्बाह्य शुद्धि करून सुधारणा घडविली पाहिजे, नाहींपेक्षां आपलें भवितव्य भयानक आहे. ह्या विचारानें ब्राम्हणांचें

ब्राम्हण्य गेलें, त्यांचा स्वाभिमान नष्ट झाला व त्यांना मायबाप सरकारकडून मिळणाऱ्या भाकरीवरचें एककल्ली जीवन सुखाचें वाटूं लागलें व वाटत आहे. सरकारनें हळूं हळूं ह्या वर्गास आपलासा करून आपलें राज्ययंत्र सुव्यवस्थित चालण्यास त्याचा चांगला उपयोग करून घेतला. सरकारी शाळा कॉलेजांतून उच्चनीच भेदास खो मिळाल्यामुळें अगदीं सुरुवातीस नाहीं तरी कांहीं वर्षांनें इतर वर्णाचे लोक त्यांत भरती झाले व पदवीधर बनून बाहेर पडूं लागले. त्यामुळें विवक्षित दर्जाचें शिक्षण घेतल्यानंतर उच्च वा नीच वर्णाचा मनुष्य सारख्या खुर्चीचा अधिकारी झाला. अशी ही न कळत मोठी राजकीय व सामाजिक क्रांति घडून आली आणि त्यांतून चातुर्वर्ण्य पद्धतींतून वाढलेला हिंदु समाज समतेच्या पायरीवर येऊन थडकला. सरकारी दृष्टीनें हें झालें असलें, कोर्ट कचेऱ्यांतून उच्च-नीच वर्ण सरभेसळ मिसळत असले तरी ब्राह्मणांचे पूर्वसंस्कार एकदम नाहींसे न झाल्यामुळें त्यांची खाजगी वागणूक कांहीं वर्षांपूर्वी पूर्ववत् असे. परंतु आज आंतबाहेर ब्राह्मण इतरांशीं सारखा मिसळूं लागला आहे. ब्राम्हण नागावला व त्याचें सामाजिक महत्व कमी झालें तरी तो स्वत:स इतरापेक्षां श्रेष्ठ मानत राहिला. अजूनहि शूद्रास वेदाचा अधिकार नाहीं. त्याला यज्ञयागादिक कर्मे करतां यावयाची नाहींत, ही त्याची ओरड चालू होतीच. हें सामाजिक व पारमार्थिक पारतंत्र्य घालविण्याच्या दृष्टीनें ब्राह्मण ब्राह्मणेतर वादास तोंड लागलें. महात्मा ज्योतिबा फुले यांच्या नेतृत्वाखालीं ब्राम्हणेतर पक्ष उत्पन्न होऊन सत्यशोधक समाजाची स्थापना झाली व त्याच्या प्रचारकांनीं ब्राम्हणजातीविरुद्ध यथेच्छ तोंडसुख घेण्याचें शस्त्र उपसलें. ब्राम्हण नि:सत्व व अभिमानशून्य बनल्यामुळें ब्राम्हणेतरांचा प्रचार यशस्वी झाला. ब्राम्हणांचें वर्णश्रेष्ठत्व गेलें व कधीं न अनुभवलेल्या निकृष्टस्थितीचा त्यांना आहेर झाला. सडकेनें जातांना ब्राम्हणास सुखाचा शब्द ऐकणें महाग झालें आहे. खाजगीरीत्या आणि सभांतून त्याची अवहेलना व छीथू करण्यांत येत आहे. ब्राम्हणानें रक्षिलेल्या वर्चस्वाचा सूड उगविण्याची भाषा ब्राम्हणेतर बोलत आहेत. शूद्र पुरुष आणि स्त्रिया ह्यांच्याप्रमाणें ब्राम्हण जातींतील पुरुष व स्त्रिया दासदासी बनून झाडलोट, भांडीं घांसणे, कपडे धुणें वगैरे हलकीं कामें करूं लागतील तो सुदिन साजरा करण्याचा विरोधकांचा कृतसंकल्प आहे. याही पलिकडे ब्राम्हण म्हणून जात नष्ट करण्याचें कांहीं एकांनीं कंकण बांधलें आहे. ज्या ब्राह्मण वर्णानें अवघड परिस्थितींतून भारतीय संस्कृतीचें जतन केलें, ज्यानें मोठ्या कष्टानें अपूर्व अशा पुरातन वाङ्मयाचें रक्षण केलें, ज्यानें धर्म, न्याय, सदाचार भूतदया परोपकार इत्यादि सद्बुद्धि शिकवून इतर वर्णांचें कल्याण साधलें, ज्यानें तोंडानेंच न बकतां प्रसंगोपात्त समशेरी हातीं घेऊन राज्यें संभाळलीं अशा दिव्य ज्ञातीच्या उपकाराची

फेड ब्राम्हणेतरांनीं त्यांच्या मूळावर उठून करणें हें त्यांना न्याय्य आहे का ? स्वात्मोद्धाराचे भावनेनें ब्राह्मणाशीं स्पर्धा करण्याची भाषा बोलण्यास कोणाची ना नाहीं, परंतु मत्सरबुद्धीनें ब्राह्मणास मागें लोटून स्वतः समोर येण्याचा ह्यांचा सुसंघटित प्रयत्न चालू आहे. त्या करतां ह्यांनीं शिक्षण, राजकारण, समाजकारण, इत्यादि क्षेत्रांत बहुसंख्येनें पदार्पण केलें आहे. म्हणूनच आज इतर जातींत पदवीधर, वकील, बॅरिस्टर, डॉक्टर सपाटून निघत आहेत. ह्या सुशिक्षितांनीं धीरे धीरे सर्व चळवळींचीं सूत्रें हस्तगत केली आहेत. धर्माच्या बाजूकडे कानाडोळा न करतां त्यांनीं आपल्या जातींत उपाध्ये तयार केले. ते कामापुरते वेद आणि धर्मतंत्र शिकले व हल्लीं सर्व धर्मकृत्यें स्वतः पार पाडताहेत. सरकारही पक्षपात बुद्धीनें त्यांच्या मदतीस धावून आलें आहे. सरकारी खात्यांतील नोकऱ्याकरतां आलेल्या अर्जांत पहिली पसंती ब्राह्मणापूर्वीं इतर वर्णीयांना द्यावी, असें धोरण सरकारनें जाहीर केलें आहे. हा मताधिक्याचा ( majority ) काळ असल्यामुळें कायदे कौन्सिलें, म्युनिसिपालिट्या वगैरे संस्थांतून मताधिक्याचे जोरावर पुष्कळदां अधिकाराचे जागीं व सभासद म्हणून अक्षरशत्रु आणि अक्कलहीन अशा ब्राह्मणेतरांचा भरणा होत आहे मोठेपणाच्या हावेनें ह्या जबाबदारीच्या जागा अडवून ते लोक कारभाराचें ज्ञानाभावीं संस्थांच्या कारभारांत घोटाळे करून ठेवताहेत व त्यांचीं कटु फळें सामान्य जनतेस चाखावीं लागत आहेत. त्यांनीं कारभारी होऊं नये, राजकारण चालवूं नये किंवा चळवळी करूं नयेत असें समंजसवृत्तीचे लोक केव्हांही म्हणणार नाहींत. ज्यांत मानव्याचा उत्कर्ष आहे, समाजाचें हित आहे व राष्ट्राचें भलें आहे तें करण्यांत प्रत्येकानें आपलें कसब दाखविण्याची महत्वाकांक्षा धरणें योग्यच आहे. परंतु अनुभव भलताच आल्यामुळें सत्य जरी कटु असलें तरी पुष्कळांचें पुष्कळ हित साधण्याकरतां तें उघड करणें भाग पडलें. तात्पर्य मताधिक्यास किंमत दिल्याबरोबर गुणाधिक्याची पायमल्ली झाली व स्वार्थसाधूपणास स्थान मिळून समाजहित तुडविल्या जाऊं लागलें.

ह्या सर्व बाजूनें गाडें उलटलें व ब्राह्मणास आज कुठेंच स्थान राहिलें नाहीं. ब्राम्हणेतरांची मत्सर व सूडबुद्धि त्यांच्या मुळावर आली. तरी ब्राह्मणांचा विद्याव्यासंग सुटला नाहीं. सरस्वती देवीचे त्यांचेवर अनान्वित उपकार असल्यामुळें त्या उपास्यदेवतस सोडून त्यांचा जीव कसा राहील ? इंग्रजी शिक्षण महाग पडत असलें, शिक्षण संपल्यानंतर दुरून दिसणारा आशेचा डोंगर आणखी लांब जात असला, प्रत्यक्षांत ह्या शिक्षणाचा कांहींच उपयोग नाहीं असा दररोजचा अनुभव कानठाळ्या फोडून सांगत असला–तरी ब्राह्मणाचें पोर, द्रव्याभावीं माधुकरी मागेल, वार लावील, भीकेची झोळी धरील पण कांहीं तरी

ज्ञान संपादन केल्याशिवाय रहाणार नाहीं, व आज रहात नाहीं व राहूं नये. जगाचे बाजारांत उतरतांच त्याला आभाळ फाटलेलें दिसतें. नोकरींत शिरावें तर पुष्कळदां ब्राह्मण कुलोत्पन्न म्हणूनच त्याला No vacancy (जागा नाही) च्या पाटीनें निरोप देण्यांत येतो. डॉक्टर किंवा वकील व्हावें तर गरजे-पेक्षां त्यांची संख्या अधिक वाढल्यामुळें धंदा चालविण्याचा खर्च काढणें कठीण जातें, व्यापारांत पडावें तर भांडवल नाहीं व सामान्य दुकानदारी करावी तर ठिकठिकाणीं दुकानें झालीं असल्यामुळें वाव नाहीं. ज्या ब्राह्मणाजवळ इस्टेटी आहेत, जुन्या काळीं लागलेल्या नोकरीची ज्यास साथ आहे, व्यापा-रांत जो बनून गेला आहे असे थोडथोडके ब्राह्मण सोडल्यास बाकीच्यांच्या गतीस पारावार नाहीं. त्यांचें भवितव्य त्यांचेसमोर ' आ ' पसरून उभें आहे.

अशा रीतीनें सभोंवारच्या परिस्थितीच्या रगड्यांत पिसला जाणारा ब्राह्मण स्वतः हताश झाला आहे. त्याला ब्रम्हकुलांत जन्म प्राप्त होणें भाग्याचें न वाटतां शाप वाटतो. त्याचा स्वाभिमान नाहींसा झाला आहे. त्यास जातिभेदाची चौकट राष्ट्रविघातक आहे असें वाटून आपल्या पूर्वजांनीं वर्णभेदाचा अभेद्य परकोट निर्माण करण्यांत आपली शक्ति व्यर्थ वेंची घातली म्हणून दुःख होत आहे. वर उद्धृत केलेली कारणपरंपरा लक्षांत घेऊन पुष्कळसे ब्राह्मण कुलाचार व कुलपरंपरा यांनीं टिकलेलें आपलें जन्ममूलक अस्तित्व सुद्धां घालविण्याचे भरीस पडले आहेत.

पण ब्रह्मवृंदहो, आपल्या पूर्व पराक्रमाचें स्मरण करा, आपली तेजस्वी परंपरा लक्षांत घ्या आणि उत्साहित व्हा. ज्या तुम्हीं अनंतकालापासून बुद्धीची ठेव जतन करून ठेविली, त्याबद्दल रोख किंमत घेणें कठीण आहे काय! तुम्हीं आपल्या बुद्धीच्या प्रभावानें जगाची उलथापालथच काय पण गरजच पडेल तर दुसरें जग निर्माण करूं शकतां, असा दांडगा आत्मविश्वास बाळगा. आजहि कांहीं बिघडलें नाहीं. अझूनहि तुमचें बुद्धितेज मंदावलें नाहीं. समा-जानें तुमचा पाणउतारा केला असला तरी शिक्षणांत तुम्हीं मागें पडलां नाहीं, स्वतंत्र व्यापार धंद्यांत आपलें बुद्धिकौशल्य खर्च करून तुम्हीं इतरांना हर-विलें आहे! आणि राजकारण खेळतां खेळतां तुम्हीं म्हातारे झालां आहांत, तेव्हां तें क्षेत्र तुम्हीं काबीज केलें असल्यास काय नवल ?

उदाहरणानेंच या गोष्टीची साक्ष पटवावयाची झाल्यास भिन्न भिन्न क्षेत्रांतील खालीं दिलेली जंत्री पुरेशी होईल. व्यापार धंद्यांत नांव कमाविलेलें श्री. किर्लोस्कर, विमा व्यवसायांत प्रसिद्धीस आलेली धी वेस्टर्न इंडिया कंपनी, सातारा, साख-रेच्या उत्पादनांत प्रथित यश अशी शुगर सिंडिकेट, लुगडी-खण यांचे कारखानदार सांगलीचे श्री. टिकेकर, वकीली धंद्यांत नांवाजलेले प्रिव्हि कौन्सिलचे सभासद बॅ. जयकर व दुसरे श्री. तेजबहादूर सप्रू, डॉक्टर म्हणून पुढें

आलेले डॉ. देशमुख M. L. A. व डॉ. भडकमकर, कॉंग्रेसचे व देशाचे राजकारण हालवून सोडणारे पं. जवाहरलाल व मद्रास प्रांताचे प्रिमिअर श्री. राजगोपालाचार्य, आंतरराष्ट्रीय राजकारणांत कसलेले भाई मानवेंद्रराय, हिंदुत्वाचा प्रश्न घसास लावणारे धर्मवीर डॉ. मुंजे व तरुण भारतास एका झेंड्याखालीं लष्करी वृत्तीनें संघटित करणारे डॉ. हेडगेवार ह्याशिवाय अनेक नांवें देतां येतील, पण स्थलाभावीं एवढेंच पुरे.

येथवर आजच्या ब्राह्मणाचें स्वरूप मांडल्यानंतर चातुर्वर्ण्यपद्धतीचा अवशेष म्हणून राहिलेला ब्राह्मण हिंदवी राष्ट्रोद्धार व स्वात्मकल्याण ह्या दृष्टीनें पुढें कसा असावा ह्याचा विचार करूं व असा विचार करणें हिंदु समाजास भाग आहे. नुसतेंच ब्राह्मणाचें नांवानें खडे फोडून निकालांत निघण्याइतका हा प्रश्न हलका नाहीं. आज चातुर्वर्ण्यपद्धति नष्ट होऊन त्यांतून ब्राह्मण व शूद्र ( ब्राह्मणेतर ) जात तितकी कायम राहिली आहे. पूर्वी चार वर्ण होते त्यावेळीं त्या सर्वांत नांदणारा एकजिनसीपणा ह्या अवशिष्ट राहिलेल्या दोन जातींत नाहीं, उलट त्यांच्यांत भयंकर वैषम्य व द्वेष वाढला आहे. अशा परिस्थितींतून चातुर्वर्ण्य-पद्धतीचें पुनरुज्जीवन होण्याची आशा केवळ कल्पनाचित्र आहे. हिंदु राष्ट्र व हिंदु समाज ह्याचें भावी स्वरूप लक्षांत घेतां ह्या वाढत्या वैषम्यास वेळींच मूठमाती देणें शहाणपणाचें होणार आहे, कारण हें आपसांतलें भांडण देशाच्या व धर्माच्या स्वातंत्र्याआड येत आहे.

जगाच्या कोणत्याहि राष्ट्रांतील समाजाकडे नजर फिरविल्यास त्यांत आपणास प्रामुख्यानें दोन जाती दिसून येतील. एक सुसंस्कृत ( cultured ) आणि दुसरी असंस्कृत ( uncultured ) हें कल्चर, ज्यास मराठी परिभाषेंत आपण संस्कृति म्हणून संबोधितो, ती काय चीज आहे ? मॅथ्यु ऑरनॉल्ड नांवाच्या आंग्ल ग्रंथकाराच्या शद्बांत सांगावयाचें झाल्यास **संस्कृति म्हणजे पूर्णत्वाची आवड व तदनुषंगिक अभ्यास होय.** " कल्चर अँड अनार्की " ह्या पुस्तकांत मॅथ्यु म्हणतो, " Culture is then properly described not as having its origin in curiosity, but as having its origin in the love of perfection; it is a study of perfection " ब्राह्मणजातीनें तरी आज हजारों वर्षें आपलें रक्त कशाकरतां झिजविलें ? कल्चरकरतांच ना ! स्वजातीचाच नव्हे तर राष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास तयार करण्यांत त्यांनीं आपलें जीवनसर्वस्व खर्च केलें ही गोष्ट लपलेली नाहीं. तेव्हां सांस्कृतिक अनुभूति ज्यांना पूर्ण आली आहे अशा ह्या ब्राम्हण जमातीस समाजानें सुसंस्कृतजाति ( cultured race ) म्हणून जगवून राष्ट्राचे अभ्युदयाचे दृष्टीनें तीस पुष्ट करणें योग्य होईल. प्रत्येक सुसंस्कृत व्यक्तीस,

त्याची जन्मजात कांहीं कां असेना, त्या जातीचा अधिकार प्राप्त होईल. गुणकर्मांनेंच जर जातिभिन्नत्व ठरतें असा सिद्धान्त आहे तर सद्‌गुणांची वाढ करून, सदाचार संपन्न होऊन व सत्वशीलता बाणवून कोणीहि सुसंस्कृत जातीचा घटक बनूं शकेल. ज्यांच्यांत ही कुवत नसेल ते असंस्कृत म्हणून जीवन कंठतील. असें झाल्यास विरोध तो कुठें राहिला व वैषम्यास स्थान तें काय राहिलें ? सद्‌गुण व संस्कृति हें उच्चत्वाचें माप ठरविल्यानंतर कुणासहि भांडणास जागा रहाणार नाहीं व समाजांत स्वास्थ्य नांदेल. परिणामीं **सुसंस्कृत म्हणजे ब्राम्हण आणि असंस्कृत म्हणजे अब्राम्हण** अशा दोनच वर्गांचा समाज राष्ट्रहितार्थ एकजुटीनें झटेल ह्यांत शंका नाहीं.

लेखाची मर्यादा फार वाढल्यामुळें आजच्या ब्राम्हणाबद्दल सूचक विचार दिग्दर्शित करून हा लांबलेला लेख पूर्ण करतों.



# वेदांग-ज्योतिष

( लेखकः—श्री. **गंगाधर रामकृष्ण देव**, नागपूर. )

[ प्रस्तुत ज्योतिष विषयक लेख **श्री. गं. रा. देव**, नागपूर टिळक पंचांग-कर्ते व संपादक, शास्त्रीय ग्रंथमाला, नागपूर ह्यांच्या अधिकारी लेखणींतून निघाला आहे. श्री. देव हे ना. सं. कॉलेजमधील ज्योतिष विषयाचें सन्मान्य शिक्षक आहेत.—**सं.** ]

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष आणि छंदशास्त्र ही वेदाचीं सहा अंगें असून तीं वैदिक ब्राम्हण बहुधा पाठ करितात. सांप्रत वैदिक ब्राम्हण जें ज्योतिष म्हणतात तो भाग वेदांगज्योतिष म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांत पांच वर्षांचें एक युग अशी पद्धति आहे. ह्या पांच वर्षांच्या युग पद्धतीच्या ज्योतिषाचा थोडक्यांत इतिहास सांगण्याकरितां हा लेख लिहीत आहे.

वेदांगज्योतिष उत्पन्न होण्यापूर्वी भारतीयांचें ज्योतिःशास्त्रांतिल ज्ञान फार थोडें होतें. तेव्हां त्यांना सात ग्रहांची आणि सत्तावीस नक्षत्रांची ओळख झाली होती व त्या प्रत्येक ग्रहावरून एकेका वारास नांव देऊन सात वारांची पद्धति प्रथमतः भारतीयांनींच इसवीसनापूर्वी २१०२ सालीं सुरू केली ( दप्तरीकृत भारताची रचना ). ग्रहणें करणारे राहु केतु हे पात त्यांना माहित असून त्यांची गति उलटी आहे हेंही त्यांना माहित झालेलें असावें. तथापि इसवीसनापूर्वी २१०० च्या अगोदर सूर्याच्या गतिशिवाय कोणत्याही ग्रहाच्या गतीचा त्यांनीं विचार केलेला नव्हता. सूर्याच्या गतीचा मात्र त्याकाळीं बराच खोल अभ्यास झालेला होता. सुमारें हजार वर्षें एक सारखा अनुभव घेऊन इसवीसनापूर्वी ३१०२ चे अगोदरपासून त्यांनीं ठरविलें होतें कीं, आर्तव वर्षांचें मान सुमारें ३६५ $\frac{1}{4}$ दिवसांचें आहे, व सूक्ष्मपणें ११२ वर्षांचें ४०९०७ दिवस होतात. ह्मणजे ३६५ $\frac{1}{4}$ दिवसांप्रमाणें वर्षांचें मान घेतल्यास त्यांत ११२ वर्षांत १ दिवसाची चुकी होते असें ठरविलें होतें. ह्याप्रमाणें ते प्रत्येक वर्ष ३६० दिवसांचें घेऊन प्रत्येक चौथें वर्ष ३८१ दिवसांचें घेत असत. पण ११२ वें वर्ष ३८० दिवसांचें घेत. वर्षारंभीं ह्मणजे वसंतविषुवाचे दिवशीं सूर्य कोणत्या नक्षत्रीं आहे याचा ते नेहमीं वेध घेत असत व त्यावरून हजार वर्षांनीं विषुवबिंदु एक नक्षत्र मागे जातो असेंही त्यांना दिसून आलें होतें. इसवी सनापूर्वी ३१०२ ह्यावर्षी विषुवबिंदु रोहिणी नक्षत्रीं होता व इसवी सनापूर्वी २१०२ ह्या काळीं तो कृत्तिका नक्षत्रांत होता हें त्यांनीं

पाहिलें होतें. त्याचप्रमाणें सूर्याचें उत्तरायण आणि दक्षिणायनही त्यांना माहिती होतें. परमउत्तरायणबिंदु आणि परमदक्षिणायनबिंदु ह्यामध्यें किती अंतर आहे हेंही त्यांनीं वेधानीं मोजलें होतें व हें अंतर सध्याच्या गणनापद्धतीप्रमाणें ४९ अंश ३९ कला येते. ( त्या काळीं अंश कला ही गणनापद्धती नव्हती. ) ह्या काळीं धर्मकृत्यामध्यें बहुतेक चंद्राच्या स्थितीचा उपयोग करीत नव्हते. परंतु चंद्र-स्थितीचा धर्मकृत्यांत उपयोग करावा अशा विचारामुळेंच इसवी सनापूर्वी २१०० ह्या काळापासून चंद्रगतीचाही भारतीय लोक विचार करूं लागले. सूर्यासंबंधानें ज्यांना इतकें ज्ञान मिळवितां आलें त्यांना चांद्रमासाचें मान साधारण सूक्ष्मपणें ( ordinary accuracy ) ठरविणें अशक्य नव्हते व इसवीसनापूर्वी १९०० ते १७०० च्या सुमारासच त्यांनीं ४०० तिथींचें चंद्राचे एक चक्र होतें असें ठरविलें. वायुपुराण अध्याय ५० श्लोक १८२ ह्यांत असें सांगितलें आहे कीं, वैधयुगांत ४०० विद्युत् आहेत, यामध्यें एक चरांश होत असतो, ह्याला एक नाडिकाच कारण आहे. या श्लोकापूर्वीच्या श्लोकांतच ११२ वर्षांत सूर्याचे दिवस किती होतात हें सांगितलें आहे. ( वैदिककालगणनापद्धति पान ५८ ). त्यावरून या श्लोकांत चंद्रगति संबंधानें सांगितलेलें असणें संभवते आणि एकनाडिका कारण आहे ह्यावरून तर ह्या वचनांत एका तिथीचा पूर्ण क्षय होण्यास किती काळ लागतो तेंच सांगितलें असावें असें निश्चितपणें वाटतें. कारण एका तिथीचा काळ साधारणपणें एका दिवसापेक्षां एकाच घटिकेनीं कमी असतो. ६४ तिथींचे ६३ दिवस म्हणजे ६४ तिथींत एक क्षयतिथी, हें मान बरेंच सूक्ष्म आहे. त्याप्रमाणें ४०० तिथींमध्यें ६$\frac{३}{४}$ क्षय होतात हेंच ह्या श्लोकांत सांगितलें आहे. कारण चरांश याचा अर्थ $\frac{३}{४}$ क्षय असा होईल. एकूण ह्या वचनावरून ६४ तिथींचे ६३ दिवस हें मान त्या काळीं माहित झालें होतें व तो काळ इसवीसनापूर्वी १९०० ते १७०० होय असें त्याच अध्यायांतील १९७ ते १९९ श्लोकांत विषुव-दिवस सूर्य कृत्तिकेच्या पहिल्या पादांत असतांना होतो असें सांगितलें आहे ह्यावरून ठरते. मैत्रायणीउपनिषदांतही विषुवबिंदूची हीच स्थिती सांगितली आहे.

चंद्रसूर्याच्या गतीचें इतकें ज्ञान झालें असतां त्यांच्या गतीचें एक युग बनविण्याची खटपट सुरू झाली हेंच वेदांगज्योतिषाच्या उत्पत्तीचें मूळ आहे. युग म्हणजे ज्या ठराविक काळानें सूर्यचंद्राची किंवा ग्रहांची तशीच स्थिति पुन्हा येते तो काळ. असें एक युग मागील काळीं माहित होतें. तें म्हणजे एकट्या सूर्या-संबंधानें, त्याच्या गतीचे चार वर्षांचे युग किंवा ११२ वर्षांचे सूक्ष्म युग. चंद्र आणि सूर्य या दोहोंच्याही गतींना लागूं पडेल असें एकच युग बनविण्याच्या इच्छेमुळें बऱ्याच चुका स्वीकारल्या जाऊन वेदांगज्योतिषाचें गणित निर्माण झालें. ह्या गणितांत ३६६ दिवसांचें वर्ष मानलें गेलें. अशा पांच वर्षांचे एक युग. या पांच वर्षांची नांवें संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर, अनुवत्सर आणि इद्वत्सर

अशी होती. वर्षारंभ माघ महिन्यापासून होत असे. अशा पांच वर्षांच्या युगांत सूर्याचें संपूर्ण फेरे ५ आणि चंद्राचे ६७ फेरे मानिले गेले. तसेंच सूर्य मास ६० आणि ३० मासानंतर एक एक अधिक मास असे दोन अधिक मानीत असत. युगाच्या पहिल्या संवत्सर वर्षांत माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, पौष ; दुसऱ्या परिवत्सर वर्षांत माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष आणि पौष, तिसऱ्या इदावत्सर वर्षांत माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, अधिक श्रावण, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, आणि पौष; चौथ्या अनुवत्सर वर्षांत माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष आणि पौष; पांचव्या इद्वत्सर वर्षांत माघ, फाल्गुन चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, पौष आणि अधिक माघ असे एका युगांत ६२ चांद्रमास मानीत. ह्या गणितांत अधिक मास माघांत व श्रावणांतच येत असे. युगाचा आरंभ सूर्य व चंद्र हे दोन्हीही आकाशांत धनिष्ठाधांत किंवा धनिष्ठा नक्षत्राच्या आरंभीं असतांना माघ महिन्याच्या, तसेंच उत्तरायणाच्या आरंभीं होत असे. ह्या एका युगासारखीच पुढील सर्व युगें घेतां येतील अशी प्रथम कल्पना होती पण ह्या युगाचे गणितांत फार चुकी होती. ६२ चांद्रमासाचे वास्तविक दिवस १८३०.८९६४ आहेत, ते या युग गणितांत १८३० घेतले गेले. १८३० दिवसांत सूर्याचे पांच फेरे होऊन शिवाय ३.६६४४७ अंश इतकी गति जास्त होते. चंद्राचे फेरे ६६ होऊन ३५२.७३५७४४ अंश इतकीच गति होते म्हणजे ६७ फेरे पूर्ण होत नाहींत. ह्यामुळें युगाचे गणित आकाश स्थितीशीं लौकरच जुळेनासे होतें. त्यामुळें ऋद्वेदांगज्योतिषानें ६ युगें गेल्यानंतर युगाच्या ठराविक दिवसांपैकीं २४ दिवस गाळून टाकण्याची युक्ति योजिली. ती कशी हे पुढील कोष्टकांवरून लक्षांत येईल :—

| युग आणि दिवस | सूर्यगति | चंद्रगति |
|---|---|---|
| एक युग म्हणजे १८३० दिवस | ५ फेरे + ३.६६४४७ अंश | ६६ फेरे +३५२.७३५७४४ अंश |
| सहा युगें म्हणजे १०९८० दिवस | ३० फेरे + २१.९८६८२ अंश | ४०१ फेरे +३१६.४१४४६४ अंश |
| सहा युगें म्हणजे १०९५६ दिवस ( २४ दिवस गाळून ) | २९ फेरे + ३५८.३३३ अंश ह्मणजे सुमारें ३० फेरे | ४०१ फेरे + ०.१८२७ अंश ह्मणजे सुमारें ४०१ फेरे |

२४ दिवस सोडीत ही गोष्ट ऋग्वेदांगज्योतिष श्लोक ५ ह्यांतील 'दिनंत्यजः' ह्या शब्दांनें सांगितली आहे. अर्थात् आकाशामध्यें धनिष्ठार्धी किंवा धनिष्ठा नक्षत्रारंभीं चंद्रसूर्य आलेले पाहून हे दिवस सोडत हें उघड असून ती गोष्ट त्या श्लोकांत दिली आहे. ह्या सहा युगांनीं २४ दिवस सोडण्याच्या युक्तीनेंही थोडी चुकी संगळतेच ती नाहींशीं करण्याकरितां १८ युगाचे शेवटीं २४ दिवस न सोडतां १९ व्या युगाचे शेवटीं २३½ दिवस सोडावे लागतात हें पुढील कोष्टकांवरून दिसेल:—

| युग आणि दिवस | सूर्यगति | चंद्रगति |
|---|---|---|
| १८ युगाचे पूर्ण ३२९४० दिवस | ९० फेरे + ६७.९६०४६ अंश | १२०५ फेरे +२२९.२४३३९२ अंश |
| १८ युगें ३२८६८ दिवस ( ७२ दिवस गाळून ) | ८९ फेरे + ३५४.९९९ अंश | १२०३ फेरे + ०.५४८१ अंश |
| १९ युगें ३४६९८ दिवस ( ७२ दिवस गाळून ) | ९४ फेरे + ३५८.६६४ अंश | १२६९ फेरे +३५३.२८३८ अंश |
| १९ युगें ३४६९८½ दिवस ( ७१½ दिवस गाळून ) | ९४ फेरे + ३५९.१५६८ अंश सुमारें ९५ फेरे | १२६९ फेरे +३५९.८७१९ अंश सुमारें १२७० फेरे |

आज उपलब्ध असलेल्या ऋग्वेदांगज्योतिषांत नक्षत्रारंभ धनिष्ठारंभींच आहे. परंतु वायुपुराण अध्याय ५० व मैत्रायणी–उपनिषद ह्यावरून त्या ज्योतिषांसारखें ज्योतिष इसवीसनापूर्वी १९०० ह्या काळांपासून चालू झालें असावें असें दिसतें. इतक्या चुकीचें ऋग्वेदांगज्योतिष दीर्घकाळपर्यंत कसें चालू शकलें असेल अशी शंका कै० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांना आली होती ( भारतीयज्योतिःशास्त्र, प्रथमावृत्ति पान ९२ व ९३ ). परंतु ह्याचें

उत्तर असें आहे कीं, २४ दिवसाचा त्याग करून गणित आकाश स्थितीशीं मिळते घेत असल्यामुळेंच ते दीर्घकाळ चालूं शकलें ( दप्तरीकृत भारतीय युद्धकालनिर्णय पान २ व ३ ).

ऋग्वेदांगज्योतिषानंतर लौकरच यजुर्वेदांगज्योतिष पद्धति निघाली कारण ऋग्वेदांगज्योतिषांत युगाचे दिवस १८३० घेतले जात हें फारच चूक होतें म्हणून दर युगाचे शेवटीं एक दिवस सोडून नंतरच पुढील युगाचा आरंभ करावा म्हणजेच युगाचे दिवस १८३१ घ्यावे अशी यजुर्वेदांगज्योतिष पद्धति सुरूं झाली. ह्या ज्योतिषाचा हा विशेष **लोकमान्य टिळकांनीं** Vedic chronology पान ८६ वर दिला आहे. अर्थात् ह्यामुळें ६ युगांनीं २४ दिवस गाळण्याऐवजी ३० दिवस म्हणजे सुमारें एक चांद्रमासच गाळावा लागे, हें पुढील कोष्टकांवरून दिसून येईल:—

| युग आणि दिवस | सूर्यगति | चंद्रगति |
|---|---|---|
| एक युग<br>१८३१ दिवस | ५ फेरे<br>+ ४. ६५ अंश | ६७ फेरे<br>+ ५.९१२ अंश |
| सहा युगें<br>१०९८६ दिवस | ३० फेरे<br>+ २७. ९० अंश | ४०२ फेरे<br>+ ३५.४७२६ अंश |
| सहा युगें<br>१०९५६ दिवस<br>( ३० दिवस गाळून ) | २९ फेरे<br>+ ३५८.३३३ अंश<br>ह्मणजे सुमारें ३० फेरे | ४०१ फेरे<br>+ ०.१८२७ अंश<br>म्हणजे सुमारें ४०१ फेरे |
| ३७१ चांद्रमास<br>१०९५५.८४७८ दिवस | २९ फेरे<br>+ ३५८. १६ अंश<br>म्हणजे सुमारें ३० फेरे | ४०० फेरे<br>+ ३५८ अंश<br>म्हणजे सुमारें ४०१ फेरे |

पण हे यजुर्वेदांगज्योतिषाचें गणितही फार दिवस चालूं शकत नाहीं. कारण ६२ चांद्रमासाचे १८३१ दिवस ह्याप्रमाणें ३७२ चांद्रमासाचें १०९८६ दिवस होतात ह्यांतून एका चांद्रमासाचे २९.५१६१ दिवस वजा करून ३७१

चांद्रमासाचें १०९५६·४८३९ दिवस येतात परंतु ३७१ चांद्रमासाचे वास्तविक १०९५५.८४७८ दिवस आहेत. ह्मणजे ३० वर्षांनीं सुमारें ३८ घटिकांचा फरक येईल व सुमारें ६० वर्षांत ७६ घटिकांचा फरक येईल. हा फरक लक्षांत येणें अशक्य नाहीं. ह्यामुळें लौकरच सुधारणा होऊन ६४ तिथींचे ६३ दिवस ज्यांत आहे अशी पूर्वीं माहित असलेली गणितपद्धति सुरू झाली असली पाहिजे. असें मानल्यानें महाभारतीय युद्धकाळाच्या वेळीं ज्या चुका गणितांत होत्या असें दिसून येतें त्या सर्वांची उपपत्तीही लागते ( भारतीय युद्धकाल निर्णय पान ३५ ). भारतीय युद्ध इसवी सनापूर्वी ११९७ ह्यावर्षी झालें व ही ६४ तिथींचें ६३ दिवस घेण्याची सुधारलली यजुर्वेदांगज्योतिष पद्धति भारतीय युद्धापूर्वी २१३ वर्षे सुरू झाली. ह्या पद्धतीमध्यें कधीं ३० वर्षांनीं तर कधीं ३५ वर्षांनीं ह्याप्रमाणें ९५ वर्षांत तीनदां क्षयमास घेत असत व ह्याप्रमाणें गणिताचा आकाश स्थितीशीं मेळ बसवीत असत.

क्षयमास घेऊन आकाश स्थितीशीं मेळ बसविण्याची युक्ति बराच काळ चालल्यानंतर भारतीयांच्या लक्षांत त्याचीच दुसरी एक युक्ति भारतीय युद्धानंतर २६ वर्षांनीं आली. ती अशी कीं, चौथें युग चालू असतां त्याचें पांचवें वर्ष अजिबात गाळल्यास म्हणजेच १९ वर्षांनीं चंद्रसूर्याची स्थिती पूर्ववत् आकाशांत होतें हें पुढील कोष्टकांवरून दिसून येईल:—

| युग | चांद्रमास | दिवस |
|---|---|---|
| चार युग | २४८ | ७३२३.५८५६ |
| युगाच्या शेवटल्या वर्षाचे मास ( अधिक माघ मास धरून ) | १३ | ३८३.९ |
| १९ वर्षे | २३५ | ६९३९.६८५६ |
| एका वर्षाचें ३६५.२५६३ दिवस घेऊन १९ वर्षांचे | | ६९३९.८६९७ |

ह्यावरून दिसेल कीं, चौथ्या युगाचें शेवटलें वर्ष सोडल्यानें आकाश स्थितीशीं मेळ बसतो व ह्या रीतीनें मेळ बसवू लागलें म्हणूनच महाभारतांत क्षय संवत्सराचा निर्देश आलेला आहे ( कैं० दीक्षितकृत भारतीयज्योतिःशास्त्र प्रथमावृत्ति पान १२५ ) ह्या कल्पनेनेंच पुराणांत दिलेल्या कृतयुगारंभाची व त्रेतायुगारंभाची उपपत्ती लागते ( वैदिककालगणनापद्धती पान ३८ ते ४५ )

भारतीय युद्धानंतर निदान ५५८ वर्षपर्यंत ही १९ वर्षांनीं क्षयसंवत्सर घेण्याची पद्धती चालू होती म्हणजे ही पद्धती इसवीसनापूर्वी ६३९ पर्यंत चालू होती. ही पद्धती विश्वामित्रानें नवीन श्रवणादिनक्षत्रगणना सुरू केली तेव्हां बंद पडली. त्यापूर्वी कलियुग १०० वर्षांचे असूनही ते ९६ वर्षांचें घेतलें गेलें, कारण त्यांत क्षयसंवत्सर चार आले होते. तसेंच पुढील कृतयुग ४०० वर्षांचे असूनही ३८० वर्षांचे घेतले गेले. ( वैदिककालगणनापद्धती पान ४० ते ४३ ). ह्याप्रमाणें २४ क्षय संवत्सराची उपपत्ति लागते. परंतु क्षय संवत्सर एकून २९ घेतले गेले असे वसिष्ठसिद्धांताच्या कालाच्या विचारांवरून ठरते. ( भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण पान ७८, ८४ व ८५ ). ह्यावरूनच ही वेदांगज्योतिषद्धति बंद होण्याचा काळ ठरतो. हा इसवीसनापूर्वी ६३९ वर्षे होय. म्हणजे वेदांग-ज्योतिषाचा काळ इसवीसनापूर्वी १९०० ते ६३९ हा होय.

पुढें सुरू झालेली विश्वामित्राची पद्धतीही वेदांगज्योतिषपद्धतीच होय असेही म्हणतां येईल. कारण तींतही पांच वर्षांचें युग आहे. म्हणून तिचीही येथें थोडीशी माहिती देत आहे. ह्या विश्वामित्राच्या पद्धतींत युग पांच वर्षांचें असून त्याचे दिवस १८२६ घेतले जात ( दप्तरीकृत धर्मरहस्य पान २२४–२२५ ) व क्षयमास किंवा क्षयसंवत्सर न घेतांच आकाश स्थितीशीं मेळ बसवीत असत तो असा कीं, एका वर्षांत ३७१ तिथी घेत. पांच वर्षांचे युगांत १८५५ तिथी व ३० वर्षांत १११३० तिथी म्हणजे ३७१ चांद्रमास व ह्याचे दिवस ६४ तिथींचे ६३ ह्याप्रमाणें १०९५६.०९३७ होतात, त्या ऐवजी ह्या पद्धतींत १०९५६ दिवस ते घेत. ही पद्धती इसवीसनापूर्वी ४११ पर्यंत चालू होती. येथून वेदांगज्योतिष पद्धतीप्रमाणें पांच वर्षांचे युग ही पद्धती भारतांतून नष्ट झालेली दिसते. इसवी-सनापूर्वी ४११ पासून पितामहाची ८ वर्षांचे युग असली पद्धती सुरू झाली. असा हा वेदांगज्योतिषपद्धतीचा थोडक्यांत इतिहास आहे.



# संस्कृत काव्यांतील सृष्टिवर्णनें



[ **कुमार श्री. भा. वर्णेकर, काव्यतीर्थ,** ह्यानीं आपल्या ह्या सुंदर निबन्धांत सृष्टिवर्णनाचें काव्यांतील स्थान ठरवून संस्कृत मधील सृष्टिवर्णनाचें दिग्दर्शन केलें आहे. त्यावरून त्यांची काव्यमय व रसग्राहक दृष्टि स्पष्ट होते. हे ना. सं. कॉलेजचे एक उत्तम विद्यार्थी असून हल्लीं संस्कृत B. A. ( Hons. ) मधें शिकत आहेत.—**सं.** ]

---

प्रस्तुत विषयाचें विवेचन करताना प्रथमतः काव्य म्हणजे काय ? व त्याचा सृष्टिवर्णनाशीं संबंध काय ? याचा विचार अवश्य आहे, साहित्य-शास्त्रावरील निरनिराळ्या ग्रन्थकारांच्या मनांत ‘ काव्य ’ या शब्दाच्या व्याख्ये-बद्दल ऐकमत्य नाहीं. एका साहित्यिकानें प्रतिपादन केलेलें काव्याचें लक्षण त्याच्या नंतरच्या साहित्यिकाने तर्कनिकषावर घासून सदोष ठरविलेलें दिसतें. त्यामुळें साहित्यशास्त्रांत काव्याच्या व्याख्येच्या दृष्टीनें निरनिराळे सम्प्रदाय उगम पावले.

पहिला सम्प्रदाय “ तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ” या मताच्या साहित्यिकांचा, म्हणजे शब्द व अर्थ या दोहोंसही प्राधान्य देणारांचा. भामह, मम्मट, वामन, हेमचन्द्र वगैरे साहित्यिक याच सम्प्रदायाचे अनुसारी होते.

दुसरा सम्प्रदाय “ रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् । ” या मताच्या ह्मणजे केवळ शब्दालाच प्राधान्य देणाऱ्यांचा. काव्यादर्श, अग्निपुराण, रसगङ्गाधर, चन्द्रालोक इत्यादि ग्रन्थ या मताचे प्रतिपादक होत.

या नंतरचे सम्प्रदाय वरील दोन्ही लक्षणे अव्याप्तिदोषयुक्त ठरविणाऱ्या साहित्यिकांचे होत. त्यामध्ये नाट्यशास्त्रकार भरतमुनि याचा रससम्प्रदाय हा सर्वांत श्रेष्ठ गणला जातो. साहित्यदर्पणाचा कर्ता विश्वनाथ यानेहि “ वाक्यं रसात्मकं काव्यम् ” हेंच काव्याचें लक्षण सांगून मम्मटादि जुन्या साहित्यिकांच्या व्याख्येतील दोष विशद केलेले आहेत.

आनन्दवर्धनाचार्य यांनी ‘ ध्वनि ’ म्हणजे व्यङ्ग्यार्थ हाच काव्याचा आत्मा आहे असें प्रतिपादून एक नवीन सम्प्रदाय सुरू केला. या शिवाय वक्रोक्तिजीवितकार कुन्तक याचा वक्रोक्तिसम्प्रदाय व वामनाचार्याचा रीतिसम्प्रदाय देखील साहित्यशास्त्रांत प्रचलित होते.

अशा रीतीने काव्याच्या लक्षणाच्या दृष्टीने इतकें मतवैभिन्न्य असलें तरी सृष्टिवर्णन हा विषय काव्यकक्षेच्या बाहेर जात नाहीं; किंबहुना तो फक्त काव्याचाच विषय आहे हे जगन्नाथपण्डिताच्या पुढील वाक्यावरून कळून येईल. रससम्प्रदायावर टीका करताना जगन्नाथ पण्डित म्हणतोः—

" यत्तु रसवदेव काव्यमिति साहित्यदर्पणे निर्णीतं तन्न। वस्त्वलङ्कारप्रधानानां काव्यानामकाव्यत्वापत्तेः। न चेष्टापत्तिः। महाकविसम्प्रदायस्याकुलीभावप्रसङ्गात्। तथा च **जलप्रवाहवेगनिपतनोत्पतनभ्रमणानि कविभिर्वर्णितानि कपिबालादिविलसितानि च।** " या अवतरणावरून सृष्टिवर्णन हा महाकविसम्प्रदायानुसार काव्याचाच विषय असून जलप्रवाहवेगनिपतनोत्पतनादिकांची कवींनी केलेली वर्णनें ही 'नीरस' असली तरी सहृदयांना आन्ददायक असल्यानें निःसंशय 'काव्य' या संज्ञेला पात्र आहेत. याशियाय संस्कृत साहित्यशास्त्रांत काव्य हें

**" नगरार्णवशैलर्तुचन्द्रसूर्यादिवर्णनैः।**
**अलंकृतमसंक्षिप्तरसभावनिरन्तरम्॥ "**

अशा प्रकारचे असावे असे स्पष्ट म्हटलेलें आहे. शहरें, समुद्र, पर्वत, ऋतु, चन्द्र, सूर्य इत्यादि विषयांचे आलंकारिक सविस्तर व शृंगारवीरकरुणादि रसांना उचंबळविणारे मनोहर वर्णन हे काव्यांत मुख्यत्वेकरून आले पाहिजे. सृष्टिसौन्दर्याच्या रसभरित मनोहर व अलंकारांनी युक्त अशा सविस्तर वर्णनाच्या श्रवणाने किंवा वाचनाने उदात कल्पना, उत्कृष्ट विचार व श्रेष्ट मनोवृत्ति यांचा उत्तम परिपोष होऊन अन्त:करणें आनन्दाने भरून जातात. म्हणून सृष्टिवर्णन हा काव्याचाच विषय अथवा काव्यच आहे असें म्हणता येईल. परंतु केवळ रसात्मक वाक्यांना काव्य म्हणण्यांत जी आपत्ति ओढवली तीच याहि बाबतीत शक्य असल्याने शीर्षकांत " काव्यांतील " या शब्दाचा प्रयोग साभिप्राय केलेला आहे.

कवींच्या ठिकाणी निसर्गत:च असलेली जी नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा असते तिच्या योगाने सामान्य माणसांच्या पूर्वी कधींहि अनुभवाला न आलेले किंबहुना त्यांच्या मनालाहि कधी न शिवलेले असे नित्य नवीन भामणारे विषय कवि सहृदय वाचकांच्या मनश्चक्षूंपुढे उभे करू शकतो याच प्रज्ञेला प्रतिभा असे नांव असून " प्रतिभैव कवीनां काव्यकरणे कारणं। व्युत्पत्त्यभ्यासौ तस्या एव संस्कारकारकौ न तु काव्यहेतू। " असें वाग्भटाने आपल्या ग्रन्थांत म्हटलेले आहे. व्युत्पत्ति आणि अभ्यास कितीहि असले तरी रमणीयार्थप्रतिपादक शब्दरचना घडण्यास प्रतिभाच कारणीभूत आहे—" तस्य च कारणं कविगता केवला प्रतिभा—" असेच जगन्नाथ पण्डिताचेहि मत आहे. प्रतिभा ही एक मनोगत शक्ति असून तिच्यामुळें कवीला काव्यविषय रमणीयत्वाने ओतप्रोत

भरलेला दिसतो आणि तेणे करून तो आपल्याला दृश्य झालेल्या त्या रमणीय विषयाचे वर्णन यथोचित शद्बांनी करून तो विषय वाचक किंवा श्रोते यांच्यापुढें जणु काय प्रत्यक्ष उभा करतो. कवि म्हणजे एक प्रकारचा अतीन्द्रिय द्रष्टा होय. तो आपल्या अद्भूत दृष्टीने स्वत: तर अदृष्टपूर्व व रच्यगोष्टी पाहतोच पण आपण पाहिलेल्या व अनुभविलेल्या त्या रमणीय वस्तूचें यथार्थ वर्णन शद्बद्वारा करून इतर कमी भाग्यवान् जीवांनाहि तो त्या रमणीय अनुभवाचे वाटेकरी करतो. महाभारतांतील दुष्यन्त आणि शकुंतला यांची कथा कालिदासापूर्वी कोणी वाचली नव्हती असें नाही पण तीच कथा कालिदासासारख्या प्रतिभावंताने वाचतात त्याच्या लेखणीतून वाग्देवतेला ललामभूत झालेलें " अभिज्ञान शाकुंतल " अवतीर्ण झालें. हीच गोष्ट इतर 'कवींच्या' बाबतीत देखील लागू पडते. सूर्योदय, चन्द्रोदय, सूर्यास्त, चन्द्र, चन्द्रिका, सागर, सरिता, सरोवरे, आकाश, तारका, पर्वत, वनें, उद्यानें इत्यादि सृष्टितील दिव्यें सर्वच पाहतात व पाहून आनन्दित होतात. पण जें पाहिलें त्याचें यथार्थ वर्णन करून इतरांनाहि त्या आनन्दाचे भागीदार करण्याचें सामर्थ्य फक्त 'कवीं'च्याच ठिकाणीं असल्याने सृष्टिवर्णनें हा कविकृतीचाच विषय आहे असे म्हणणे गैर होणार नाहीं.

प्रतिभेप्रमाणेच मनाची संस्कार क्षमता हा गुण कवींच्या ठिकाणी सृष्टि-वर्णनात्मक काव्य निर्माण होण्यास आवश्यक आहे. महाराष्ट्र कवींच्या ठिकाणी या गुणाचा अभाव अगदी उघड दिसून येतो. महाराष्ट्रांत ऋतुमानाचें वैचित्र्य आहे. शेतांचे, कुरणांचे, वृक्षवनस्पतीचे सौंदर्य भरपूर आहे; ओढे, नद्या, धबधबे, सरोवरें यांनी महाराष्ट्राला रमणीयत्व आलेले आहे; गगनचुंबी पर्वत, भीषण दऱ्या, उंच उंच कडे, किर्र रानें इत्यादि सृष्टीतील वैचित्र्यें महाराष्ट्रांत हवी तेवढी असून त्यांचा उपयोग करावयास लागणारे संस्कारक्षम हृदय नसल्याने, मराठीत सृष्टिवर्णनात्मक काव्याचा बहुतांशी अभावच आढळून येतो. याच्या उलट परिस्थिति आंग्ल कवींच्या बाबतींत दिसून येते पृथ्वीवरील कोणत्याही देशापेक्षां सृष्टिसौंदर्याच्या बाबतींत इंग्लंडचा नंबर केव्हाहि खालचाच लागेल, तथापि त्या देशातील वाङ्मयाचा इतिहास पाहिला तर त्या देशांतील कवींच्या हृदयावर तेथील भौतिक परिस्थितीचे संस्कार फार बलवत्तर झालेले आढळून येतील. " एकोणिसाव्या शतकांतल्या इंग्रजी काव्यवाङ्मयांत निसर्गाशिवाय इतर सूरच ऐकू येत नाही " असे एका काव्यज्ञाचें म्हणणे आहे. किंबहुना Naturalism हाच त्याच्या काव्यवाङ्मयाचा विशेष झालेला आहे. सृष्टि-सौंदर्याशी तादात्म्य पावण्याचा गुण आंग्ल कवींच्या ठिकाणी कसा उत्कटत्वाने वास करीत होता हें वर्डस्वर्थ कवीच्या काव्यावरून नीट कळून येईल.

संस्कृत कवींच्या ठिकाणीं हा गुण किती उत्कटत्वानें वास करीत होता हे पुढें ओघाओघानें कळून येईलच.

संस्कृतांत प्रायः महाकाव्यच लिहिणारे कवि असल्यानें केवळ सृष्टिवर्णन हाच विषय त्याना सम्प्रदायाप्रमाणे महाकाव्याकरिता घेणें शक्य नसते. तथापि महाकाव्यातून विषयानुरोधाने ठिकठिकाणीं सृष्टिवर्णनें आढळतात. अशारीतीने 'सृष्टिवर्णन' हा विषय संस्कृत काव्यांत अङ्गभूत असून ऋग्वेद, रामायण, रघुवंश, कुमारसम्भव, शिशुपालवध, नैषध, हरिवंश, कादम्बरी, हर्षचरित इत्यादि सर्व महाकाव्यांत व "काव्येषु रम्य" नाटकांत तो त्याच स्थितीत आढळतो. केवळ सृष्टिवर्णनालाच वाहिलेलीं अशीं मेघदूत व ऋतुसंहार हीं खण्डकाव्ये सोडली तर तशी इतर काव्येच संस्कृत भाषेत नाहीत असे म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि महाकाव्यांतून ठिकठिकाणी आढळणारी मनोरम सृष्टिवर्णनें ती उणीव जाणवू देत नाहीत. महाकाव्यातील सृष्टिवर्णनपर सर्ग हे वाचकास स्वतंत्र काव्यासारखेच वाचकांच्या अनुभवास येतात.

काव्यनिर्मिती होण्यास प्रतिभा जितकी कारणीभूत असते तितकेंच सृष्टि-वर्णनात्मक काव्य निर्माण होण्यास कवींच्या निवासस्थलाचे सृष्टिसौंदर्यहि बऱ्याच अंशीं कारणीभूत होत असते. दृष्टी पुढें प्रत्यहीं घडणारे सृष्टीतील चमत्कार पाहून कवीला ते वर्णन करण्याची स्फूर्ति होते. अर्थात् ज्या प्रकारची कवीची निवासभूमि असेल त्याच प्रकारची वर्णने कवींच्या काव्यांत असावीत यांत आश्चर्य नाहीं. इतिहास संशोधकांनीं कवींच्या या मनोधर्माचा बराच लाभ उचलला. कालिदास, भवभूति, भारवि इत्यादि महाकवींच्या निवासस्थलांचा शोध काढताना संशोधकांनीं त्यांच्या काव्यांतील सृष्टिवर्णनावरूनच तर्क लढविलेले आहेत. "मराठ्यांच्या संबंधानें चार उद्गार" या आपल्या पुस्तकांत राजाराम रामकृष्ण भागवत यांनीं भारवीच्या निवासस्थलासंबंधीं तर्क लढविताना

"उरसि शूलभृतः प्रहिता मुहुः प्रतिहतिं ययुरर्जुनमुष्टयः।"
भृशरया इव सह्यमहीभृतः पृथुनि रोधसि सिन्धुमहोर्मयः॥

या किरातार्जुनीयांतील एका श्लोकाचा आधार घेऊन "जशा सह्याद्रीच्या कड्यावर समुद्राच्या लाटा मोघ होतात, असा किराताच्या अठराव्या सर्गांत उद्गार काढणारा भारवि निःसंशय दाक्षिणात्य होय. मग तो मऱ्हाठा असो किंवा अस्सल द्रविड असो."

प्रो. मिराशींनीहि आपल्या कालिदास या प्रबन्धात कालिदास हा उज्जयिनीचाच रहिवासी होता हे सिद्ध करण्यासाठीं मेघदूतांतील

**" वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां
सौधोत्सङ्गप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः "**

या श्लोकाचा आधार घेऊन ज्याअर्थी कालिदासानें मेघाला मोठ्या आग्रह-पूर्वक उज्जयिनीस जाण्याची विनंती करून त्या नगरीचें बारीक सारीक वर्णन दहा श्लोकांत केलें त्याअर्थी तो निःसंशय उज्जयिनीचाच रहिवासी असला पाहिजे असा तर्क केलेला आहे. याच्या उलट काश्मिरी पंडितांनी ' शक्रावतार ' ' शचीतीर्थ ' इत्यादि शाकुंतलांतील स्थलांचा उल्लेख करून कालिदास हा काश्मिरी असावा असा तर्क केलेला आहे.

भवभूतीच्या बाबतींतहि " **अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पद्मपुरं नाम नगरं** " असा त्याच्या निवास स्थानासंबंधी स्पष्ट उलेख असताहि हें **' पद्मपुर '** म्हणजे भंडारा जिल्ह्यातलि आमगांवाजवळचे **' पद्मपुर '** कीं मालतीमाधवाच्या ९ व्या अंकांत भवभूतीनें वर्णन केलेली पद्मावती नगरी—जिला आज पद्मपवाया म्हणून ओळखतात—याचा वाद करताना संशोधकांची दृष्टि भवभूतीच्या नाटकांतील सृष्टिवर्णनाकडे वळते व त्याच्या अनुरोधाने ' पद्मपुर ' म्हणजे भंडारा जिल्ह्यांतील पदमपूर कीं नरवारच्या इशान्येस २५ मैलावर असलेले पदमपवाया हा वाद चालू होतो.

हें ' पद्मपुर ' रामचरितातील दंडकारण्याच्या

**" तृष्यद्भिः प्रतिसूर्यकैरजगरस्वेदद्रवः पीयते "**

या सारख्या घोर आणि भीषण वर्णनावरून भंडारा जिल्ह्यातीलच असावें असा एकाचा तर्क तर,

**" पद्मावती विमलवारिविशालसिंधु—
पारासरित्परिकरच्छलतो बिभर्ति ।
उत्तुङ्ग सौधसुरमन्दिरगोपुराट्ट—
संघट्टपाटितविमुक्तमिवान्तरिक्षम् ॥**

अयंच मधुमती–सिन्धुसम्भेदपावनो भगवान्भवानीपतिरपौरुषेयप्रतिष्ठः सुवर्णबिन्दुरित्याख्यायते । " इत्यादि मालतीमाधवातील वर्णनावरून ' पद्मपुर ' म्हणजे नरवारच्या इशान्येस २५ मैलावर असलेले पदमपवाया हें खेडेंच असले पाहिजे असा दुसऱ्या मताच्या संशोधकांचा पक्ष.

सारांश, संस्कृत कवींच्या संबंधी निश्चित ऐतिहासिक उल्लेख नसल्यानें संशोधकांची दृष्टि सहाजिकच त्या कवींच्या काव्यांतील सृष्टिवर्णनांकडे वळते व त्यांच्या अनुरोधानें ते ऐतिहासिक माहिती संबंधी तर्क जुळवू लागतात.

परंतु अशा तऱ्हेची तर्क पद्धति कवींच्या संबधानें उपयोगांत आणणे धोक्याचें असते. सर्व साधारण दृष्टीनें पाहूं गेले असतां या तर्क पद्धतीत मुळींच दोष दिसत नाहीं; परंतु सर्रास याच नियमानें सर्व कवींची निवास स्थळें निश्चित ठरवू लागल्यास कसा घोटाळा माजेल हें किरातार्जुनीयाच्या प्रस्तावनेंत ( निर्णयसागर प्रत ) सम्पादकानें फार उत्कृष्ट रीतीनें दर्शविलेले आहे.

तो म्हणतोः—

" अत्र यदि सह्याद्रिनामग्रहणमात्रेणैव भारवेर्दाक्षिणात्यत्वमङ्गीक्रियेत, तदा तु दक्षिणदिक्प्रसिद्धानां मलय–सह्य–सुवेलादिपर्वतानां कावेरी–गोदावरी–ताम्रपर्णी भीमा–वेण्यादिनदीनां च वर्णयिता हरविजयकारः सुप्रसिद्धकाश्मीरकरत्नाकर–महाकविरपि दक्षिणात्य एवेत्यपि सुवचम्। एवं विन्ध्याटवीवर्णनतत्परो बाणोऽपि विन्ध्याद्रिवासी कश्चन भिल्लः स्यात्। अन्येऽपि स्वर्गपातालादि–वर्णनबद्धपरिकराः कवयस्तत्तत्प्रदेशवास्तव्या देवा दानवाश्च भवितुमर्हन्तीत्यतिसरला सरणिर्देशनिर्णये समुद्गीर्णा भागवतमहाशयेन। "

तात्पर्य, कवि काव्यांतील सृष्टिचेंही प्रायः विषयानुरोधाने व प्रतिभेच्या दिव्य दृष्टीने वर्णन करीत असल्याने त्या वर्णनातील स्वमताला परिपोषक असें सृष्टिवर्णनात्मक श्लोक उद्धृत करून कविसम्बन्धी ऐतिहासिक तर्क लढवीत बसणे खात्रीने उपहसनीय होईल.

सृष्टिवर्णन करताना कवीची दृष्टि सृष्टिसौन्दर्य पाहिल्यानंतर स्वतःला तें जसे दिसले ते जसेच्या तसें सहृदय वाचकांच्या प्रत्ययास कसें आणतां येईल याकडे असते. त्याकरिता तो बहुधा उपमा, उत्प्रेक्षा, रुपक, व्यतिरेक तथा निदर्शना या सारखे साधर्म्यावर आधारलेले अलंकार उपयोगांत आणतो. सरळ वर्णनापेक्षा सालंकृत वर्णन वाचकांना वर्णनीय वस्तूची यथार्थतेने कल्पना आणून देण्यास जास्त समर्थ होतें.

पर्वत मेघांनी आच्छादिलेले आहेत; त्यावर जलधारा वहात आहेत. त्यांच्या गुहांतून वारा सोसाट्यानें वहात आहे. असे वर्षाऋतूंतील पर्वताचे सरळसरळ वर्णन वाचून जो आनंदानुभव येतो त्याहून

" मेघकृष्णाजिनधरा धारायज्ञोपवीतिनः।
मारुतापूरितगुहाः प्राधीता इव पर्वता॥ "

हे वर्णन वाचून जास्त आनंदानुभव येतो, किंबहुना प्रत्यक्ष पर्वतच अन्तर्दृष्टिपुढें उभा राहतो.

वालिमकीरामायणांत सुन्दरकाण्ड, किष्किन्धाकाण्ड, अरण्यकाण्ड, युद्धकाण्ड वगैरे काण्डांत निरनिराळया सर्गातून जी सुंदर सुंदर सृष्टिवर्णनें आढळतात त्यामध्यें बहुधा उपमा, उत्प्रेक्षा, रूपक या अलंकारांचाच प्रादुर्भाव आढळून येतो.

मेघाभिरामा परिसम्पतन्ती
सम्मोदिता भाति बलाकपङ्क्तिः।
वातावधूता वरपौण्डरीकी
लम्बेव माला रुचिराम्बरस्य ॥

किंवा किष्किन्धा काण्डांतील ३० व्या सर्गातील शरदृतूतील रात्रिवर्णनांत

रात्रिः शशाङ्कोदितसौम्यवक्त्रा
तारागणोन्मीलित चारुनेत्रा।
जोत्स्नांशुकप्रावरणा विभाति
नारीव शुक्लांशुकसंवृताङ्गी ॥

किंवा

हंसो यथा राजतपञ्जरस्थः
सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः।
वीरो यथा गर्वितकुञ्जरस्थः
चन्द्रोपि बभ्राज तथाम्बरस्थः ॥

इत्यादि श्लोकातील यथार्थ उपमा वाचल्यानंतर वर्णनीय वस्तु जणू काय स्वतःच्या दृष्टी पुढेंच उभी आहे असा वाचकाला भास होतो.

त्याचप्रमाणें

षट्पादतन्त्रीमधुराभिधानं
प्लवंगमोदीरितकण्ठतालम्।
आविष्कृतं मेघमृदङ्गनादै—
र्वनेषु सङ्गीतमिव प्रवृत्तम् ॥
क्वचित्प्रनृत्तैः क्वचिदुन्नदद्भिः
क्वचिच्च वृक्षाग्रनिषण्णकायैः।
व्यालम्बबर्हाभरणैर्मयूरै-
र्वनेषु सङ्गीतामिवप्रवृत्तम् ॥

इत्यादि श्लोकातील उत्प्रेक्षा फारच बहारीच्या आहेत. वालिमकीच्या काव्यांत अतिशयोक्ति, भ्रान्तिमान् यासारख्या कृत्रिम अलंकारांनी युक्त अशी सृष्टिवर्णने मुळीच आढळत नाहीत. परंतु त्यानंतरच्या कवींच्या काव्यांत अशाप्रकारचे अलंकार व भडक वर्णन फार आढळतात.

**भिन्नेषु रत्नकिरणैः किरणेष्विहेन्दो-**
**रुच्चावचैरुपगतेषु सहस्रसंख्याम् ।**
**दोषाऽपि नूनमहिमांशुरसौ किलेति**
**व्याकोशकोकनदतां दधते नलिन्यः ॥**

किंवा

**सप्तर्षिहस्तावचितावशेषाण्यधो विवस्वान् परिवर्तमानः ।**
**पद्मानि यस्याग्रसरोरुहाणि प्रबोधयत्यूर्ध्वमुखैर्मयूखैः ॥**

यासारखी भडक सृष्टिवर्णनें वाल्मिकींच्या काव्यांत कदापि आढळणार नाहीत. किष्किन्धा काण्डांतील पम्पासरोवराच्या आसमन्तातील वनसौंर्याचे वर्णन फारच बहारीचे आहे. ते वाचत असताना आपण त्या वनांतच उभे आहो कीं काय असा वाचकाला भास होतो. जिकडे तिकडे वसंताचें राज्य चालू झालेलें आहे. प्रत्येक वृक्षावर भृङ्गाचें गुञ्जन, कोकिलांचें कूजन, मत्तमयूरांचें नर्तन वनांत आनन्दाची लूट करीत आहेत, वनाच्या मध्यभागीं पम्पेचें स्फटिकतुल्य शुभ्र जल चमचमत आहे. कामोद्दीपक वायूचा सुखस्पर्श अनुभवास येत आहे. अशातऱ्हेचे सृष्टिचें तें नितान्तरमणीय सौंदर्य पाहिल्यावर राम लक्ष्मणास म्हणतो:—

**यदि दृश्येत सा साध्वी यदि चेह वसेमहि ।**
**स्पृहयेयं न शक्राय नायोध्यायै रघूत्तम ॥**

वाल्मिकीरामायणांत स्थळोस्थळी असल्या प्रकारची सुन्दर सृष्टिवर्णनें वाचावयास मिळतात. अर्थात या लहानशा निबन्धांत त्याचा साकल्याने उल्लेख करता येणे शक्यच नाही. तो एक स्वतंत्र निबन्धाचा विषय आहे.

( पूर्वार्ध )



# आर्य चाणक्य

[ भारतांतीलच नव्हे तर सर्व जगांतील प्रमुख राजनीतिपटु आर्य चाणक्याचें हें धावतें व्यक्तिदर्शन आपल्या सद्य:स्थितींत किती उद्बोधक होईल हें वाचकानींच ठरवावें. **कुमार गं. कृ. पोटे, काव्यतीर्थ,** हे या लेखाचे लेखक असून ते हल्लीं B. A. ( Hons ) ( संस्कृत )चे वर्गांत शिकत आहेत. त्यांचें वाचन मूलग्राही व मार्मिक असून लिखाण ही हृदयंगम आहे. हे तीर्थ परीक्षेपर्यंत नागपूर संस्कृत कॉलेजचेच विद्यार्थी होते.—**सं.** ]

---

**उपलशकलमेतद् भेदकं गोमयानां**
**बटुभिरुपहृतानां बर्हिषां स्तूपमेतत् ।**
**शरणमपि समिद्भिः शुष्यमाणाभिराभिः**
**विनमितपटलान्तं दृश्यते जीर्णकुड्यम् ॥**

शुष्क गोमयाचें चूर्ण करण्याकरतां असलेला दगडाचा तुकडा, कोवळ्या बालकांनी आणलेल्या कुशांचा ढीग, वाळत ठेवलेल्या यज्ञकाष्ठांनी छदिप्रांत वाकला आहे, असें पडक्या भींतीचें एक खोपटें एवढेंच त्या महाभागाचें वैभव; सरस्वतीचें सतत साहचर्य्य असल्यामुळेंच कीं काय लक्ष्मी त्याकडे पाठ फिरवून दूर निघून गेली असावी; अठराविश्वे दारिद्र्य पूर्वजापासून चालत आल्यामुळें, जन्मापासूनच त्याशीं सतत साहचर्य्य; आपल्या जन्मस्थलापासून दूरदेशीं गेल्यामुळें एकाकी जीवन; मदत असेल तर ती स्वत:चीच, पाटीलपुत्रासारख्या दूरच्या राज्यांत एक कंगाल ब्राम्हण जातो काय ! आणि मगधासारख्या रुढमूल राज्यांत क्रांति घडवून आणतो काय ! ' निःस्पृहस्य तृणं जगत् ' असा हा महापुरुष भारतदेशांत तत्कालीन प्रचंड असलेल्या मगधासारख्या राज्ययंत्राची धुरा अत्यंत हुशारीने व जोमाने पण निरपेक्ष वाहतो. असा हा चमत्कार, अशी विचित्र घटना कशी घडून आली ? कोणी घडवून आणली ? या क्रांतिकारी घटनेचा घटयिता तरी कोण ?

**अश्वा नागा स्यन्दनानाञ्च सङ्घाः**
**मन्त्राः शुद्धा दैवतञ्चानुकूलम् ।**
**एतान्याहुः साधनानि स्म राज्ञाम्**
**तेभ्योऽपीयं बुद्धिरुत्कृष्यते मे ॥**

' तुरंगमादि राज्यसाधनें मला नकोत. तीं राजाची राजालाच लखलाभ असोत. माझी बुद्धीच सर्वापेक्षां वरचढ आहे, ' असें प्रबल आत्मविश्वासाने गर्जून सांगणारा

विप्रवर्य म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून, ' नवनवतिशतद्रव्यकोटीश्वर ' नंदाचा नाश करून चंद्रगुप्त मौर्याला पाटिलपुत्राच्या सिंहासनावर बसविणारा, राक्षसासारख्या राजनीतिनिपुण स्वामिनिष्ठ अमात्याचा आपल्या बुद्धिबलानें ' आयसैरायसः छेद्यः ' या स्वोक्त नीतीचा अवलंब करून पाडाव करणारा विष्णुगुप्त चाणक्य होय. विष्णुगुप्ताचें पूर्व चरित्रच इतकें कांहीं विलक्षण आहे कीं तो महापद्मनंदानें पितृश्राद्धाचें दिवशीं यात्रावरून उठवून अपमान केल्याबरोबर **' नंदवंशध्वंसमकृत्वा नाहमिमां शिखां बध्नामि । यः खलु राज्यं लिप्सते स मामनुगच्छतु '** अशी घोर प्रतिज्ञा करतो आणि लगेच सहा महिन्यांच्या आंतच ती अमोघ करतो, याबद्दल कांहीं विशेष नवल वाटत नाहीं. तो प्रसंग असाः—

महापद्मानें आपल्या तीन सचिवांपैकीं शकटार नांवाच्या सचिवाला त्याच्या कांहीं अपराधावरून अत्यंत कडक शिक्षा केली होती. कांहीं दिवसानंतर मन पालटलें व पुन्हां त्याला मंत्रिपदावर नियुक्त केलें. असा हा शकटार सूड बुद्धीनें व्याप्त होऊन हिंडत असतां गांवा बाहेर एका मंदिराजवळ कोणी कृष्ण-काय ब्राम्हण कुशांच्या रोपट्यावर ताक शिंपडतांना त्याला दिसला. शकटार आश्चर्यचकित झाला व त्यानें प्रश्न केल्यावरून त्या ब्राम्हणानें सांगितलें कीं " विवाह समयीं एक कुशगवताचें टोंक त्याचें पायास रुतलें. त्या जखमेमुळें अशौच होऊन विवाहास प्रतिबंध झाला. त्यामुळें निव्वळ सूड म्हणून कुश-कुलांचा समूल उच्छेद करण्याच्या इर्षेनें तक्रसिंचन करीत आहे. " अचेतन वस्तूंकडून झालेल्या अपराधांचें बाबतींत देखील जो इतका करारी, तो तेजस्वी दुसरा दुर्वासच जणूं, नंदानें केलेला घोर अपमान मूग गिळून सहन करील हें शक्य तरी कसें ?

सहा महिन्यांच्या आंतच चाणक्यानें आपल्या बुद्धि कौशल्यानें आणि कुटिल नीतीनें हितोपदेशांतील विग्रह प्रकरणांत, :—

**नन्दं जघान चाणक्यस्तीक्ष्णदूतप्रयोगतः ।**
**तद्दूरान्तरितं दूतं पश्येद् वीरसमन्वितः ॥**

म्हटल्याप्रमाणें नंदाचा दूतप्रयोगाचा अवलंब करून नाश केला. लगेच ही बातमी चंद्रगुप्तास कळवून पर्वतेश्वराच्या पर्वतकाला राज्याचा अर्धा हिस्सा देण्याचें कबूल करून मौर्य्यास पाटलिपुत्रास आणलें व राज्यावर बसविलें. प्रतिज्ञार्णव तरून यशस्वी झाला म्हणून सोडलेली शिखा पुन्हा बांधली. नंदनिष्ठ अमात्य राक्षस पाटलिपुत्राच्या बाहेर जाऊन चंद्रगुप्तास राज्यावरून काढण्याचे व त्याजागीं दुसऱ्यास बसविण्याचे दृढ प्रयत्न करूं लागला. राक्षसानें चंद्र-नाशाकरतां पाठविलेली विषकन्या चाणक्यानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें राज्या-

धभाक् पर्वतकाला मारण्यांत उपयोगी आणली. व राक्षसाचा दोस्त (?) क्षपणक याने राक्षसाच्या सल्लेनुसार विषकन्या पर्वतेश्वराकडे पोंचविली अशी घोषणा करून त्याला शहरा बाहेर काढून लावले. प्रजेच्या मनांत राक्षसा-विषयीं वाईट ग्रह उत्पन्न करण्याची संधि साधली. अशा रीतीनें विष्णुगुप्तानें एका दगडानें दोन पक्षी मारण्याचें कार्य साधलें. चाणक्याला या हुशारीबाबत प्रत्यक्ष त्याचा शत्रू राक्षसच त्याला काय शिफारस देतो, तें पाहण्यासारखे आहे. तो मुद्राराक्षसाच्या दुसऱ्या अंकांत म्हणतो:—

"साधु कौटिल्य! साधु,

**परिहृतमयशः पातितमस्मासु च घातितोऽर्द्धराज्यहरः।**
**एकमपि नीतिबीजं बहुफलतामेति यस्य तव ॥**

विशाखदत्त विरचित राजकारणाच्या डावपेंचावर आधारलेल्या मुद्राराक्षस नाटकांत मुख्यत: केलेलें चाणक्याचें व्यक्तिदर्शन अत्यंत परिणामकारक रीतीनें मनावर ठसा उमटवितें. चाणक्याची राजनीति—निपुणता, अन्यत्र विरल आढळणारी योजकता, कार्यदर्शित्व इत्यादि विविध गुण वाचणाऱ्याच्या मनाची पकड घेतल्यावांचून राहात नाहीत. 'कौटिल्येन नरेन्द्रार्थे शासनस्य विधि-कृत:' म्हणून चंद्रगुप्तास राज्यनीति शिकविण्याकरतां रचलेलें कौटिलीय अर्थ-शास्त्र, अथवा त्यांतील महत्वाचीं तत्वें ज्यांत ग्रथित केलीं आहेत अशी चाणक्य सूत्रें वाचून जर कोणी अंतर्मुख होऊन विचार (Introspection) करूं लागला तर कोणाही सहृदयाला चाणक्याच्या यशाचें रहस्य, कौटिलीय योजनांची गुरुकिल्ली कशांत आहे याची साधारण कल्पना येण्यास बरीच मदत होईल.

**'मूलसूत्रं प्रवक्ष्यामि चाणक्येन यथोदितम्।**
**यस्य विज्ञानमात्रेण मूर्खो भवति पंडितः॥**

ज्याच्या वाचनाने व ज्ञानाने मूर्ख सुद्धां ज्ञानी होवूं शकतो, एकदम यक्षिणीची कांडीच जणूं फिरते, इतका ज्याबद्दल दांडगा आत्मविश्वास तो स्वतः किती पराकोटिचा पंडित व नीतिनिपुण असावा बरें? एकेक सूत्र घेऊन त्यावर मनन करूं लागलें असतां, तें रचणारी व्यक्ति केवढी बिनचूक असावी, त्याच्या कल्पना कशा रेखीव आणि स्पष्ट असाव्यात! तीं तत्वें प्रत्यक्ष आचरणांत आणून मगच तीं समर्थन केलेलीं असावींत याबद्दल वाचणाऱ्याची ठाम समजूत होते.

मुद्राराक्षस नाटक मुख्यतः त्याच्या अभिधानाप्रमाणें म्हणजे 'मुद्रया गृहीतो राक्षसो यत्र' मुद्रेच्या मदतीने ज्यांत राक्षसाचा पाडाव करण्यांत

आला आहे, त्याला आपलें ह्मणणें स्वीकारण्यास भाग पाडले आहे, असे ज्यांत दाखविलें आहे, तें नाटक. अर्थात् राक्षसाचा पाडाव करणारा कोण, हें सांगण्याची गरजच नाहीं. नन्दाचा नाश केल्यानंतर उरलेला जो राक्षस तो आपल्या बाजूला आल्याशिवाय चंद्रगुप्ताच्या राज्याला स्थैर्य नाहीं, हें जाणून चाणक्याने राक्षसाला चंद्रगुप्ताचे मंत्रिपद स्वीकारण्यास भाग पाडण्याकरतां योजलेलें नीतिनैपुण्य व तदुद्भूत विविध रोमांचकारी घटना यांची सुसूत्र व सुसंबद्ध रीतीने केलेली मांडणी ह्मणजेच मुद्राराक्षस नाटक होय. प्रत्यक्ष चाणक्यच राक्षसाला वश करण्याचें बाबतींत ह्मणतो, 'अगृहीते राक्षसे किमुत्खातं नन्दवंशस्य किंवा स्थैर्यमुत्पादितं चंद्रगुप्तलक्ष्म्याः', यावरच सर्व नाटकाची उभारणी आहे.

राक्षसाचें कार्य कौशल्य व दृढस्वामिभक्ति हे गुण चाणक्य पूर्णपणें जाणून होता. ह्मणून राक्षसाला चंद्रगुप्ताचें मंत्रिपद ग्रहण करण्यास भाग पाडलें तर अनायासेंच मौर्य्यराज्य स्थिरमूल होईल ही त्याची योग्य कल्पना.

**प्रज्ञाविक्रमभक्तयः समुदिताः येषां गुणाः भूतये ।**
**ते भृत्या नृपतेः कलत्रमितरे संपत्सु चापत्सु च ॥**

हें चाणक्य पूर्णपणें जाणून होता. चाणक्याने आपला उद्देश साध्य करण्याकरतां कन्यादूतप्रयोग अथवा त्याच्या कसोटींत उतरलेल्या गुप्त चरांकडून बरीच कामगिरी करविली. 'राजानश्चारचक्षुषः' हें राजकारणांतील तत्व दोघाही पक्षाला पूर्णपणे अवगत; पण चाणक्याचें बाबतींत—'क्रियासु युक्तैर्नृप चारचक्षुभिर्न वञ्चनीयाः प्रभवोऽनुजीविभिः' हें खरें ठरलें; उलट राक्षसाच्या बाबतींत अज्ञातकुलशीलांना सिद्धार्थक, जीवसिद्धि, भागुरायणादि वस्तुतः चाणक्याचे हेर असलेल्याना आपल्या विश्वासांत घेतलें व आपला नाश करून घेतला.

चाणक्याचा चर भागुरायण याने पर्वतकपुत्र मलयकेतूचा विश्वास संपादन करुन, त्याला चाणक्यानेच पर्वतकाला मारले असें सांगून भिवविलें, व राक्षसाकडे दोघेही गेले. राक्षस, मलयकेतु व कांही कौलूतादि राजे यांच्या सकट कुसुमपुरावर स्वारी करण्याचा बेत केला. परंतु—दैवमन्यत्रचिंतयेत् ।

चंद्रगुप्ताचा वध करण्याकरितां राक्षसाने पाठविलेले आपले हस्तक, यंत्रतोरण चंद्रगुप्तावर पाडण्याकरतां नेमलेले दारुवर्मन्, बर्बरक, विष देण्याकरतां ठेवलेला अभयदत्त नांवाचा वैद्य, शयनाधिकृत प्रमोदक आणि शयनगृहाखालीं सुरुंगांत लपलेले बीभत्सादि सर्वांचा त्यांच्या मूर्खपणामुळें व चाणक्यामुळें झालेला नाश पाहून त्यांच्याबद्दल अत्यंत कींव येते. अगोदर आज्ञा केल्याशिवायच दारुवर्म्यानें राजवाडा सुशोभित केला, हें ऐकून चाणक्य शंकित झाला. बरोबरच आहे.

अत्युपचारः शंकनीयः' (चा० सू० ) चाणक्य आपल्या तयारींत राहिला व पर्वतकाच्या भावाला—वैरोचकाला त्यांचें भक्ष्य बनविलें. दारुवर्मा आणि बर्बरक यांना स्वतःच्याच घाईने प्राणांस मुकावें लागलें. आणि जनतेंत या सर्वांच्या बुडाशीं राक्षस असावा, अशी समजूत राक्षसाबद्दल अप्रीति उत्पन्न झाली. 'यो यस्मिन्कर्मणि कुशलस्तं तस्मिन्नेव नियोजयेत्' (चा० सू० ) हें जो राजकारणी पुरुष विसरेल तो कदापि यशस्वी होणार नाहीं.

**नियोज्य मूर्खं कार्ये च राज्ञो दोषास्त्रयस्तथा।**
**अयशश्चार्थनाशश्च नरके पतनं यथा॥**

अशी राजेलोकांना विष्णुगुप्ताने चाणक्य-राजनीतींत धोक्याची सूचना देखील देऊन ठेवली आहे. भांड्याचा रंग बदललेला पाहून औषध विषमिश्रित आहे, अशी खात्री झाली व तेंच अभयदत्ताला प्यावयाला लावून चाणक्याने त्याला त्याच्या कर्माचें बक्षीसही देऊन टाकलें. भाताचे कण घेऊन भींतीच्या भेगांमधून जाणाऱ्या मुंग्या पाहून सुरुंगाचा संशय आला व ती खोलीच्या खोलीच जाळून टाकल्यामुळें बीभत्सप्रभृति धूमावरुद्धदृष्टि होत्साते मरण पावले. 'अरिप्रयत्नमभिसमीक्ष्य आत्मरक्षया वसेत्' (चा० सू० ) हें तत्व चाणक्याने आपल्या बाबतींत तरी पूर्णपणें ओळखलें यांत शंका नाही. राक्षसच ही गोष्ट कशी कबूल करतो, तें पाहण्यासारखें आहे. तो श्लोक असा:—

**कन्या तस्य वधाय या विषमयी गूढं प्रयुक्ता मया**
**दैवात्पर्वतकस्तया स निहतो यस्तस्य राज्यार्धभाक्।**
**मे शस्त्रेषु रसेषु च प्रणिहितास्तैरेव ते घातिताः**
**मौर्यस्यैव फलंति हन्त विविधश्रेयांसि मन्नीतयः॥**

राक्षस आपल्या स्वाधीन कसा होईल याची नाडी चाणक्याने बरोबर ओळखून काढली, असें म्हणावयास कांहीच हरकत नाही. चन्दनदास नावाचा नगरश्रेष्ठी राक्षसाचा प्राणप्रिय मित्र. याच्या इथेंच राक्षसाने आपलें कुटुंब ठेवलेलें. चाणक्याने त्याला पकडून आणलें व राक्षसाच्या गृहजनाबद्दल मागणी केली. परंतु त्यानें न घाबरता 'सन्तमपि गेहे राक्षसस्य गृहजनं न समर्पयामि' असें रोखठोक चाणक्यास उत्तर दिले. चाणक्यानें चंदनदासाला सहकुटुंब कैदेत ठेवण्याची दुर्गपालास आज्ञा दिली. मनांतून तर चाणक्य चंदनदासाचा शिबीसारखा अलौकिक स्वार्थत्याग पाहून चकितच झाला. आपला प्राणप्रिय मित्र आपल्याकरतां इतका त्रास सहन करीत आहे, असें राक्षसाला समजेल तर तो याच्या सुटकेकरतां खात्रीनें धांवून येईल व आपण अशा रीतीने राक्षसाला वाटेल तें

करावयास भाग पाडूं असा नाक दाबून तोंड उघडविण्याचा चाणक्याचा हेतु. हा हेतु चाणक्याचेच शब्दांत सांगावयाचा झाल्यास तो असा:—

त्यजत्यप्रियवत् प्राणान् यथा तस्यायमापदि ।
तथैवास्यापदि प्राणा नूनं तस्यापि न प्रियाः ॥

किती तरी तर्कशुद्ध विचारसरणी, आणि ह्मणूनच चाणक्याचें ध्येयच असें कीं राक्षसाला—

'बुद्ध्या निगृह्य वृषलस्य कृते क्रियाया-
मारण्यकं गजमिव प्रगुणीकरोमि ॥

त्याची ही विचारसरणी कशी कमालीची यशस्वी झाली, हें आपणास पुढें समजेलच.

राक्षस आणि मलयकेतु या दोघांत भेद पाडण्याकरतां चाणक्यानें आपल्या हेरांकरवीं योजलेली युक्ति कल्पनातीत सफल झाली. त्याच हेतुनें त्यानें चंद्रगुप्त आणि स्वतः यांत कृत्रिम कलह घडवून आणला. चंद्रगुप्ताच्याच शब्दांत सांगावयाचें ह्मणजे—

"कृतककलहं कृत्वा स्वतंत्रेण त्वया कश्चित्कालं व्यवहर्तव्यमित्यार्योपदेशः। स च कथमपि मया पातकमिवाभ्युपगतः। अथवा शश्वदार्योपदेशसंस्क्रियमाणमतयः सदैवास्वतंत्रा वयम्.' लौकरच त्यांचे चंद्रगुप्ताचे इच्छेविरूद्ध चाणक्यानें कौमुदी-महोत्सव बंद केला या बाबत बनाव घडून आला. चंद्रगुप्तानें कारण विचारल्यावरून चाणक्य, 'तूं सचिवायत्तसिद्धि असल्यामुळें या बाबतींत पडण्याची गरज नाहीं,' असें बजावतो. त्याचवेळीं राक्षसानें यांच्यांत भेद पाडण्याकरतां नेमलेला वैतालिक—

'दंष्ट्राभङ्गं मृगाणामधिपतय इव व्यक्तमानावलेपा ।
नाज्ञाभङ्गं सहन्ते नृवर नृपतयस्त्वादृशाः सार्वभौमाः ॥'

असा उत्तेजनपर श्लोक ह्मणून चेतवितो. चाणक्याला लगेच राक्षसाची करामत समजते. तो आत्मगतच ह्मणतो, "आः ज्ञातम्। राक्षसस्यायं प्रयोगः। दुरात्मन् राक्षस दृश्यसे; भोः जागर्ति खलु कौटिल्यः।" केवढा आत्मविश्वास! चाणक्य आणि चंद्रगुप्त यांत भांडण होऊन चंद्रगुप्ताने कौटिल्यास सचिवपदावरून काढलें, या बातमीचा इष्ट तो परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. त्याचप्रमाणें राक्षस चाणक्यापेक्षां प्रशस्यतर आहे, असें चंद्रगुप्तानें ह्मटलें, हें ज्यावेळीं करभक नांवाचा हेर राक्षसास सांगतो, त्यावेळीं मलयकेतु व भागुरायण तें सर्व चोरून ऐकत असतात. तें ऐकून मलयकेतु ह्मणतो—

'गुणप्रशंसया दर्शितश्चंद्रगुप्तेन राक्षसे भक्तिपक्षपातः ।

यावर लगेच चाणक्यचर पण मलयकेतु ज्याला आपला प्रियमित्र समजत असे, तो भागुरायण म्हणतो, 'न तथा गुणप्रशंसया यथा चाणक्यबटोर्निराकरणेन.' एकंदरींत काय कीं भागुरायणाने मलयकेतुचें मन राक्षसाबद्दल साशंक करून ठेवलें. तरी पण मलयकेतु राक्षसाला कुसुमपुरावर चाल करण्यास सांगतो. राक्षस क्षपणकास मुहूर्त विचारतो. क्षपणक चाणक्याचाच हेर. त्याने संध्या लग्नाची वेळ सांगितली. पण बिचाऱ्या राक्षसाला काय माहीत कीं, 'राक्षसी नाम सा वेला गर्हिता सर्वकर्मसु.' अन् तसें झालेंही.

मुद्राराक्षसाच्या पांचव्या अंकांत चाणक्याचे दोन हेर क्षपणक, जीवासिद्धि व सिद्धार्थक यांनी मलयकेतूस व राक्षस यांच्या कलहाग्नीला जोराने वारा घातला. मलयकेतुने राक्षसाला हांकून लावलें. व कौलूतादि मोठमोठ्या राजांना देहांत शिक्षा दिल्या. हा सर्व प्रकार अतिविस्तृत पण गुंतागुंतीचा आहे. तो कल्पना येण्यास संक्षेपाने पुढें दिला आहे.

मलयकेतुच्या शिबिरातून बाहेर जाणाऱ्या व येणाऱ्यांना भागुरायणाने तो राक्षसाचा प्रियमित्र (?) असल्यामुळें त्याला जाण्याचें कारण विचारलें. बऱ्याच आग्रहा नंतर त्यानें सांगितले की राक्षसाने मलयकेतुच्या पित्याला विषकन्या प्रयोगाने मारविलें. व तो आरोप माझ्यावर आला. सद्यः राक्षस कांही तरी तसेंच निर्घृण करण्याचे विचारांत आहे. म्हणून पुनरपि माझ्यावर प्रसंग येवूं नये या उद्देशाने दूर कोठें तरी निघून जात आहे. मलयकेतु आडून हें भाषण ऐकत होताच. पित्याचें नांव ऐकतांच त्याचा शोक अनिवार झाला. व बाहेर भागुरायणाकडे येवून राक्षसाला उद्देशून बाष्पस्तंभित कंठाने म्हणू लागला :—

**मित्रं ममायमिति निर्वृतचित्तवृत्तिर्विस्रंभतस्त्वयि निवेशित-सर्वकार्य्यः ।**
**तातं निपात्य सहबन्धुजनाक्षितोयैरन्वर्थतोऽपि ननु राक्षस राक्षसोऽसि ॥**

त्याचप्रमाणे ज्याने शकटदासास मृत्युच्या दाढेंतून सोडविल्यामुळें (?) राक्षसाचा परमविश्वास संपादन केला, तो चाणक्याचा दुसरा चर सिद्धार्थक राक्षसनामाङ्कित मुद्रालांछिता पेटिका, तसेंच राक्षसाच्या मुद्रेचें लांछन असलेलें पण पत्ता नसलेलें पत्र घेवून शिबिरांतून परवानगीपत्रका शिवाय जात असतांना पकडला जाऊन भागुरायणासमोर आणल्या गेला. पत्रावर—'स्वस्ति यथास्थानं कुतोऽपि कोऽपि कमपि पुरुषविशेषमवगमयति —' इत्यादि मज़कूर राक्षसाच्या जीवश्च कंठश्च शकटदासाच्या हस्ताक्षरांत लिहिला होता. त्याला बरेच चाबकाचे तडाखे लागल्यानंतर त्यानें राक्षसानें हें पत्र चंद्रगुप्तास लिहिलें

आहे व नजराणा ह्मणून हे अलंकार पाठविले आहेत असें सांगितलें. पत्राचा अर्थ तेव्हां स्पष्ट झाला. मलयकेतुला वाटले कीं सैन्याची रचना एका विवक्षित तऱ्हेनें करून राक्षस आपल्यास दगा देणार त्याला राक्षसाचा पक्का संशय आला, नव्हे त्याच्या दुष्ट (?) हेतुबद्दल पूर्ण खात्री झाली. ते राक्षसाकडे स्पष्टीकरणार्थ गेले. राक्षसास जरी त्यांतील कांहींच माहीत नसलें तरी पण सिद्धार्थक व क्षपणक दोघेही राक्षसाचे प्रगट दोस्त ( ? ), राक्षसाच्या मुद्रेचें लांछन, व मलयकेतुच्या पित्याचे ओळखीचे अलंकार यामुळें राक्षसास असंबद्ध उत्तरें द्यावीं लागलीं. राक्षस अज्ञातकुलशीलावर विश्वास टाकल्यामुळें मुद्देमालासकट ( Red-handed ) पकडल्या गेला. तेव्हां मलयकेतु त्याला टोंचून बोलतो—

चंद्रगुप्तस्य विक्रेतुरधिकं लाभमिच्छता ।
कल्पिता मूल्यमेतेषां क्रूरेण भवता वयम् ॥

मलयकेतु राक्षसाला मंत्रिपदावरून काढून लावतो. तेव्हां राक्षस चंदनदासाच्या उपकारांतून मुक्त होण्याकरतां चाणक्यानें आगाऊच वर्तविल्याप्रमाणें ठरवितो— 'चेतश्चन्दनदासमोक्षरभसं रुन्ध्यात् कृतघ्नं न चेत्' मलयकेतु अविचारानेंच कौलूतादींना शिक्षा फर्मावितो व 'अविवेकः परमापदां पदम्' या कव्युक्तिप्रमाणें भागुरायणादींकडून पकडल्या जातो. राक्षस चन्दनदासास सोडविण्याकरतां कुसुमपुरास येतो. त्याच्या आगमनाची बातमी उन्दुर नांवाच्या हेराकडून चाणक्यास कळते. तेव्हां चाणक्य एका चरा तर्फे राक्षसाला चंदनदास आज सूळावर चढविल्या जाणार आहे, अशी माहिती करून देतो. चन्दनदास व त्याची कुटुंबीय मंडळी हृदयास फोडणाऱ्या रीतीनें शेवटील क्षण घालवीत असता राक्षस तेथें जातो; व कालपाशिकांना चन्दनदास नको नको ह्मणत असता देखील पकडावयास लावतो. त्याला चाणक्या पुढें आणतात. चाणक्याला पाहतांच राक्षसाच्या तोंडून खालील उद्गार निघतात— 'अये अयं स दुरात्मा अथवा महात्मा कौटिल्यश्च,

आकरः सर्वशास्त्राणां रत्नानामिव सागरः ।
गुणैर्न परितुष्यामो यस्य मत्सरिणो वयम् ॥'

चंद्रगुप्त राक्षसास अभिवादन करतो. त्यामुळे राक्षसाच्या मनांत चंद्रगुप्ताबद्दल अनुकूल ग्रह होतो. थोड्याच वेळांपूर्वी 'तदिदानीमपि तावदरातिहस्तगतो विनश्येत् न तु राक्षसश्चंद्रगुप्तेन सह संदधीत.' अशी ठाम प्रतिज्ञा करणारा राक्षस लगेच नाक दाबल्याबरोबर तोंड उघडावे त्याप्रमाणे चाणक्याने 'अमात्य राक्षस अपेक्ष्यते चन्दनदासस्य जीवितम्? तर्हि गृह्यताम् शस्त्रम् ( मंत्रिपद स्वीकार.)। अथवा किमनेन न खलु भवतः शस्त्रग्रहणमन्तरेण चन्दनदासस्य जीवितमास्ति ।'

असें म्हणल्याबरोबर राक्षसाला चंदनदास जीवश्च कंठश्च असल्यामुळें दुसरें गत्यंतर नसतें. तेव्हां तो उत्तरतो, "भो विष्णुगुप्त उपानय खड्गं." हा भयंकर फरक कसा घडून आला ?

**त्यजत्यप्रियवत् प्राणान् यथा तस्यायमादि ।**
**तथैवास्यापदि प्राणा नूनं तस्यापि न प्रियाः ॥**

ही नाडी ओळखून त्याप्रमाणे वागणारा चाणक्य खरोखरच धन्य होय !

इथपर्यंत चाणक्याचें मुद्राराक्षसाचें आधारें धांवतें व्यक्तिदर्शन करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. प्रथम सांगितल्याप्रमाणे चाणक्याच्या व्यक्तिमत्त्वाची, यशाची व राजनीतिनैपुण्याची गुरुकिल्ली ज्याला पाहावयाची असेल. त्याला कौटिलीय अर्थशास्त्र, चाणक्यसूत्रें अथवा लघुचाणक्यराजनीति इत्यादि ग्रंथांत चाणक्याच्या विचाराचें प्रतिबिंब पडलें असल्यामुळें त्याचें व्यक्तिदर्शन स्पष्टपणें होण्यास त्या ग्रंथाची बरीच मदत होण्यासारखी आहे. चाणक्याचा मंत्रसंवरणावर बराच जोर दिसतो. 'मंत्रसंवरणे कार्यसिद्धिर्भवति' ( चा० सू० ) 'मंत्रनिःस्रावो सर्व विनाशयति' ( चा. सू. ) अथवा 'नास्य गुह्यं परो विद्याद् विद्याच्छिद्रं परस्य च' हें तत्व चाणक्याने आपल्या आचरणांत पुरेपूर उतरविलें होतें, हें मुद्राराक्षसाच्या वाचकास सहज समजून येईल. चाणक्य दैव दैव ह्मणून कधींच उदासीन बसला नाहीं, तर त्याने कसून प्रयत्न केला. 'पुरुषकारमनुवर्तते दैवम्' ( चा. सू. ) हें त्याच्या बाबतींत अगदीं खरें ठरलें.

**यद् यज्जगति पश्यामि तत्तत्पुरुषचेष्टितम् ।**
**शक्तिहीनैरनुमितं दैवमित्यपि केचन ॥**

चाणक्य अथवा त्याचे चर यांनीं जीं जीं कार्ये केलींत, तीं योग्य स्थल आणि काल पाहून केलींत, त्यामुळें दारुवर्मा व बर्बरकाप्रमाणे त्यांचा नाश झाला नाहीं. उलट 'देशकालवित् कार्यं साधयति' या ह्मणण्याप्रमाणे ते त्यांत यशस्वीच ठरले.

एकंदरींत चाणक्यासारखी व्यक्ति या जगांत दुर्मिळच. शास्त्र आणि शस्त्र सारख्याच कुशलतेने हाताळण्यांत पटाईत असलेली व्यक्तिच प्रचंड राज्यक्रांति घडवून आणूं शकते. नुसतें शास्त्रच किंवा एकाकी शस्त्रच भरींव कार्य संपादण्यास निरुपयोगी ठरतात. संभाजी महाराजासारखा नुसता शस्त्रधारी पराक्रमी पुरुष किंवा गौतमासारखा शास्त्रनिपुण महात्मा सर्व बाजूंनी आपत्तींत भरडल्या जाणाऱ्या देशाचा उद्धार करूं शकत नाहींत.

येन शास्त्रञ्च शस्त्रञ्च नन्दराजगगता च भूः ।
अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ॥

असले चाणक्यच ते पवित्र कार्य लीलया यशस्वी करूं शकतात. म्हणून शेवटीं असल्या उद्धारक विभूतींना—

अर्हतां प्रणमामः ये ते गम्भीरतया बुद्धेः ।
लोकोत्तरैर्लोके सिद्धिं मार्गैर्मार्गयन्ति ॥



# प्राचीन शिल्पशास्त्र.

लेखकः—**श्री. रत्नाकर वि. पटवर्धन**

[**श्री० रत्नाकर वि० पटवर्धन** हे नागपूर म्युनिसिपालटीत ओव्हरसीयर आहेत. पण त्यांचा ओढा संस्कृत विद्येकडे विशेष आहे. ते वेदान्त मध्यमा उत्तीर्ण झाले आहेत व तीर्थाचा अभ्यास करीत आहेत. शिल्पशास्त्रांत तर ते प्रवीण आहेतच. ते ना. सं. कॉलेजचे विद्यार्थी व सहायक आहेत.—**सं.** ]

खरोखर आपलें शिल्पशास्त्र एकेकाळीं केवढ्या उन्नत स्थितीस पोचलें होतें याची कल्पना आज उपलब्ध असलेल्या कांहीं तुरळक ग्रंथांवरून मिळते. हिंदुस्थानचें दुर्दैव म्हणा कीं, आपल्या देशांतील या विषयांवरील व अन्य विषयांवरील अतुल ग्रंथसंपत्ती परकीयांच्या हल्ल्यामुळें, नष्ट झालीं इतकें असूनही आज जें कांहीं थोडेसे ग्रंथ उपलब्ध होत आहेत त्यांचे सारे श्रेय ज्यांना आपण आज जीर्ण मतवादी म्हणून हिणवितो त्या ब्राह्मणांना आहे. त्यांनी पुरातन कालापासून परंपरेने ते सारे ग्रंथ मुखोद्गत ठेविले आणि म्हणूनच आपणाला आज आमचे जुने ग्रंथ असे असे होते अशी शेखी मिरवितां येते. पुस्तकें नष्ट होतील, घरें, दारें व राष्ट्रेंही परकीयांच्या अथवा स्वकीयांच्या हल्ल्यानें नामशेष होतील परंतु मुखोद्गत विद्या मानवजातच नष्ट झाल्याशिवाय कशी बरें नामशेष होईल ? घोटे म्हणून हिणविल्या जाणाऱ्या पाठांतरवाल्यांनीच हजारो वर्षांचा इतिहास परंपरेनी जिवंत ठेविला आहे. पाठांतराकडे दुर्लक्ष करून ( Direct method ) डायरेक्ट मेथडचा उदोउदो करणाऱ्यांनी यापासून थोडातरी बोध घेतला तरी राष्ट्राचें कल्याण होणार आहे.

शिल्पशास्त्रांत एकंदर दहा शास्त्रांचा अंतर्भाव होतो. जसे (१) कृषिशास्त्र (२) जलशास्त्र (३) खनिशास्त्र (४) नौकाशास्त्र (५) रथशास्त्र (६) विमानशास्त्र (७) वास्तुशास्त्र (८) प्राकारशास्त्र (९) नगररचनाशास्त्र आणि (१०) यंत्रशास्त्र या सर्व शास्त्रांची वाढ किती व्यवस्थित झाली होती ह्याची कल्पना शिल्प संहितांवरून येईल. शिल्प हा शब्द ‘ शिल् ’ या धातूपासून निघाला आहे. शिल् ह्मणजे दुःख निवारण करणें. यत् शीलति समादधति तत् शिल्पम्. या विश्वांत विखुरलेल्या अनंत पदार्थांचा योग्य उपयोग करून त्या मानवांच्या व

इतरांच्या उपयोगी पडतील अशी बनविण्याची जी विद्या शिल्पविद्या. कश्यपापासून शिल्पसंहितेस प्रारंभ होऊन त्यानंतर एकंदर अठरा संहिताकार झाले ते येणेप्रमाणेः—

**भृगुरत्रिर्वसिष्ठश्च विश्वकर्मा मयस्तथा ॥**
**नारदो नग्नजिच्चैव विशालाक्षः पुरंदरः ॥२**
**ब्रह्मा कुमारो नंदीशः शौनको गर्ग एव च ॥**
**वासुदेवोऽनिरुद्धश्च तथा शुक्रबृहस्पती ॥३**
**अष्टादशैते विख्याताः शिल्पशास्त्रोपदेशकाः ॥**

मत्स्यपुराण अध्याय २५२.

ह्या अठरा संहिताकारांपैकीं कश्यप, भृगु व मय ह्या तिघांच्याच संहिता आज उपलब्ध आहेत. याखेरीज शिल्पशास्त्रांचे विवरण करणारीं अठरा पुराणें व अठ्ठावीस आगम आहेत. बव्हंशी पुराणें ही उत्तरेकडचीं आहेत व आगम दक्षिण हिंदुस्थानांकडचे आहेत. कमिकागम, करणागम व सुप्रभेदागम या आगमांतून आणि अग्निपुराण, स्कंदपुराण, मस्यपुराण व महाभारत ह्या पुराणांतून स्थापत्य-कलेबद्दलचा बराच मोठा भाग आलेला आहे त्याचप्रमाणें भोजराजाच्या कालांतील वराहमिहिराच्या बृहत्संहितेतसुद्धां ह्या शास्त्राचा बराच उहापोह केलेला आहे. कौटिलीय अर्थशास्त्र, शुक्रनीती व बरीचशीं संस्कृत नाटकें ह्यामध्येही स्थापत्यकलेचे विवेचन केलेलें आढळतें.

अत्यंत व्यवस्थित रीतीनें व मोठ्या प्रमाणांत ह्या विषयांवर विवेचन केलेला जर कोणता प्राच्यविद्येतील ग्रंथ असेल तर तो 'मानसार'च होय. हा मानसार नांवाच्या ऋषीनीं लिहिलेला असल्यानें त्यास मानसार, असें नांव पडलें आहे असें म्हणतात. ह्याच ग्रंथात ब्रम्हा, शिव, विष्णु, इंद्र, बृहस्पती, नारद व त्यानंतर मानसार ऋषी अशी परंपरा असल्याचें लिहिलें आहे. श्रीयुत एम. के. आचर्य ह्यांनीं मानसाराच्या कालाबद्दल आपल्या ग्रंथांत ( Indian Archaeology ) बरीच चर्चा केली आहे त्यांच्यामतें मानसार हा ग्रंथ मयसंहिता, इतरही कांहीं संहिता, पुराणें व आगम ह्यांच्या पूर्वीचा असला पाहिजे. ह्या लहानशा लेखामध्यें सर्व शिल्पशास्त्राविषयींचे विवेचन करणें शक्य नसल्यामुळें, मी फक्त वास्तुशास्त्राचा विचार करणार आहे.

शिल्पकर्म करणाऱ्यांचे साधारणत: पांच वर्ग पडतात. ते असेः—

| संहिता | (१) | (२) | (३) | (४) | (५) |
|---|---|---|---|---|---|
| कश्यपसंहिता | शिल्पज्ञ | दैवज्ञ | विधिज्ञ | पौर | तृकर |
| भृगसंहिता | सूत्रधार | गणितज्ञ | पुराणज्ञ | कर्मज्ञ | कारू |
| मयसंहिता | स्थपति | सूत्रग्राही | तक्षक | वर्धकी | कर्मी |
| हल्लींचीं नांवे | इंजिनीयर | ओव्हरसीयर | मेस्त्री | कारागिर | बिगारी |

ह्या सर्व लोकांनीं एकमेकांच्या सल्यानें कोणतेही काम तडीस न्यावयाचें असते. सल्लामसलतींत सर्वांचा अधिकार सारखा असतो; कारण जो तो आपल्या विषयांमध्यें तज्ञ असतो. तरी परंतु स्थपती अथवा शिल्पज्ञ ह्याचा मात्र कांहीं विशेष अधिकार असतो. स्थपतीचे जे गुण सांगितले आहेत ते पाहिले असतां त्याच्या अधिकाराची साधारण कल्पना येईल.

**स्थपतिः स्थापनज्ञः स्यात्सर्व-विद्या-विशारदः ॥**
**गणितज्ञः पुराणज्ञः सत्यवादी जितेंद्रियः ॥**
**चित्रज्ञो देशकालज्ञश्चान्नदश्चात्यलुब्धकः ॥**
**अरोगी चाप्रमादी च सप्त-व्यसनवर्जितः ॥ मय०**

स्थपतीनें सर्व कार्याची योजना तयार करावयाची आणि त्याप्रमाणें आपल्या देखरेखीखालीं सर्व कामें इतर लोकांकडून करून घ्यावयाची. अशाच प्रकारची व्यवस्था आजही व्यवहारांत आहे. तरी आजचा इंजिनिअर आणि त्या कालचा स्थपति ह्यामध्ये मात्र महदंतर दिसून येतें. सत्यवादी जितेंद्रिय व सप्तव्यसनवर्जित असा इंजिनिअर आज एखादा तरी मिळेल कीं नाहीं ह्याबद्दल शंकाच आहे. असो. सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, अशा सुविद्य माणसाकडून सशास्त्र व पद्धतशीर रीतीनें बांधलेल्या इमारती अत्यंत टिकाऊ आणि शोभिवंत दिसत असत. ह्याचे उदाहरण पाहिजे असल्यास बिहारांतील प्राचीन मंदिरांचें देता येईल. मागें झालेल्या भूकंपामध्यें माठमोठ्या इंजिनिअरांनी बांधलेल्या जबरदस्त इमारती जमीनदोस्त झाल्या परंतु आपल्या प्राचीन देवालयांना मुळींसुद्धां धक्का पोहोंचला नाहीं, आणि म्हणूनच प्राचीन वास्तुशास्त्र आज आपण अनुकरण करीत असलेल्या पाश्चात्य वास्तुशास्त्रापेक्षां सरस होते असें म्हणण्यास यत्किंचितही क्षती वाटत नाही. कोणकोणत्या ग्रंथातून किती‍किती तऱ्हेच्या इमारतीचें विवेचन आलेलें आहे, ते मी खाली थोडक्यांत देत आहे.

| | ग्रंथाचे नांव | प्रकार | इमारतींच्या तऱ्हा |
|---|---|---|---|
| (१) | मानसार | १२ | ९८ |
| (२) | अग्निपुराण | ५ | ४५ |
| (३) | गरुडपुराण | ५ | ४५ |
| (४) | मत्स्यपुराण | ३ | २० |
| (५) | भविष्यपुराण | ३ | २० |
| (६) | बृहत्संहिता | ३ | २० |
| [७] | कमिकागम | ३ | २० |
| [८] | सुप्रभेदागम | २ | २० |

